



# विवेक विचार

विवेकानंद केंद्राचे सांस्कृतिक मासिक

भाद्रपद-कार्तिक • ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१५ • सोलापूर • वर्ष : ३० वे • अंक ११ वा • मूल्य रु. ५०/- • एकूण पृष्ठे : १००

तुम्हाला पुरोगामी दिसायचे असेल वा सेक्युलर म्हणून मान्यता हवी असेल, तर हिंदूंना शिव्या घालाव्या, त्यांची टवाळी करावी. सावरकर, संघ, भाजप, शिवसेना, सण, समारंभ यांची यथेच्छ हेटाळणी व्रतस्थ असल्याप्रमाणे केली पाहिजे.

भारत नावाच्या हिंदूबहुल राष्ट्राला पराभूत करायचे असेल, तर त्याच्या राष्ट्रविषयक श्रद्धांना खच्ची केले पाहिजे. नेमके तमाम भारतीय पुरोगामी सेक्युलर त्याच कामाला जुंपलेले दिसतील.




## सत्य झाकोळून टाकणारी प्रवृत्ती

# पुरोगामी दहशतवाद

*ते वेद, गीता इत्यादी धर्मग्रंथ कालबाह्य झाले आहे असे म्हणतील पण इस्लामच्या कुराण, हदिस, शरीयत आदी धर्मग्रंथासंबंधात ते मौन पाळतील. त्यांचा पुरोगामीपणा धर्मनि:पक्षपातीपणा नाही. धर्मानुसार तो बदलत असतो.*

# विवेकानंद केंद्रातर्फे 'समिधा' कार्यक्रम

**विवेकानंद केंद्राचे संस्थापक माननीय एकनाथजींच्या जन्मशताब्दीनिमित्त देशभर केंद्राचे कार्यकर्ते व हितचिंतक मेळाव्यांचे 'समिधा' या नावाने आयोजन करण्यात येत आहे. २५ ऑक्टोबर २०१५ पर्यंतचे प्रांतातील नियोजन...**

### ✻ विदर्भ ✻

**अमरावती** – १९ नोव्हेंबर २०१५, सायंकाळी ६.३० वाजता, स्थळ – टाऊन हॉल, अमरावती

**वर्धा** – २१ नोव्हेंबर २०१५, सायंकाळी ५.३० वाजता, स्थळ – सत्यनारायण बजाज सार्वजनिक वाचनालय, साई मंदिराजवळ, वर्धा

**नागपूर** – २२ नोव्हेंबर २०१५, सायंकाळी ५.३० वाजता, स्थळ – मुंडले सभागृह, अंध विद्यालय परिसर, दक्षिण अंबाझरी मार्ग, नागपूर

### ✻ पश्चिम महाराष्ट्र ✻

**पुणे** – २८ नोव्हेंबर २०१५, सायंकाळी ५ वाजता, स्थळ – टिळक स्मारक मंदिर, पुणे.

**सातारा** – २६ नोव्हेंबर २०१५

**सोलापूर** – ३० नोव्हेंबर, सायंकाळी ६ ते ८, वक्त्या – बी. निवेदिता, राष्ट्रीय उपाध्यक्ष, विवेकानंद केंद्र. स्थळ – विवेकानंद केंद्र, १६५ रेल्वे लाइन्स, सोलापूर.

### ✻ कोकण विभाग ✻

**माटुंगा** – २३ नोव्हेंबर २०१५, सायंकाळी ७ ते ९.३०, वक्त्या – बी. निवेदिता, राष्ट्रीय उपाध्यक्ष विवेकानंद केंद्र. स्थळ – कर्नाटक संघ, कटारिया मार्ग, माटुंगा (पश्चिम), संपर्क – ९३२२२३२२९७

**डोंबिवली** – २४ नोव्हेंबर २०१५, सायंकाळी ७ ते ९.३०, वक्त्या – बी. निवेदिता, राष्ट्रीय उपाध्यक्ष विवेकानंद केंद्र. स्थळ – टिळक नगर विद्यामंदिर ग्राउंड, टिळक नगर, डोंबिवली (पूर्व), संपर्क – ९८२०८३१५७१

**अंबरनाथ** – २५ नोव्हेंबर २०१५, सायंकाळी ४ ते ७, वक्ते – सुरेश दीक्षित. स्थळ – गुरुकुल सभागृह, कनसाई सेक्शन, अंबरनाथ (पूर्व), संपर्क – ०९३२३०९०२८३

**ठाणे** – २९ नोव्हेंबर २०१५, सायंकाळी ६ ते ९, वक्ते – प्रकाश पाठक. स्थळ – सहयोग मंदिर, सहयोग मंदिर पथ, ठाणे (पश्चिम), संपर्क – ९९६९०८८१७१

***




विवेकानंद केंद्राचे सांस्कृतिक मासिक

# विवेक विचार

वर्ष ३० वे - अंक ११ वा - पृष्ठे १००
भाद्रपद-कार्तिक/युगाब्द ५११६
ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१५

**मुख्य संपादक**
श्री. पी. परमेश्वरन्

**संपादक**
सिद्धाराम भै. पाटील



**पत्रव्यवहाराचा पत्ता**
**विवेक विचार**
द्वारा - विवेकानंद केंद्र,
१६५, रेल्वे लाईन्स, सोलापूर-४१३ ००१.
दू:०२१७ - २३१५९४९ (सायं ७ ते ८.३०)
**email : vivekvichar@vkendra.org**
अवश्य भेट द्या
vivekvichar.vkendra.org



**मूल्य - ५० रुपये**

**RNI NO. 46869 / 85**, 'विवेक विचार' हे मासिक मालक, 'विवेकानंद केंद्र मराठी प्रकाशन विभाग' यांचेसाठी मुद्रक व प्रकाशक धनंजय सूर्यवंशी यांनी प्रिसिजन प्रिंटस्, दैनिक तरुण भारत, १९/२०, औद्योगिक वसाहत, होटगी रोड, सोलापूर येथे छापून, विवेकानंद केंद्र, १६५, रेल्वे लाईन्स, सोलापूर येथून प्रसिद्ध केले.
संपादक - सिद्धाराम भैरप्पा पाटील


## लेखानुक्रम




६ संपादकीय






७ पुरोगामी सेक्युलर दहशतवाद




१८ पुरोगामी कंपूचा मतलबी व्यवहार




२५ उदार हिंदूंसमोरील सेक्युलर आव्हान



२९ शेषराव मोरे यांची विशेष मुलाखत — भीतीखाली वावरत आहे आजची मराठी वैचारिकता

३७ ब्रह्मदेवालाही आश्चर्यचकित करणारी - पुरोगामी बुद्धी

४३ धर्मनिरपेक्षतावाद्यांना मुस्लिम रक्ताची चटक

५८ जागतिक हिंदू - बौद्ध संमेलन गेल्या २५०० वर्षातील पहिला ऐतिहासिक प्रयोग



५२ बालविहार

६६ पोलादी पंखांची राजहंसी : अनू आगा

८४ मा.एकनाथजींनी सांगितलेला सेवेचा अर्थ


*विवेकानंद केंद्राचे संस्थापक माननीय एकनाथजी यांच्या सेवा साधना या पुस्तकातील निवडक विचार प्रत्येक पानावर प्रकाशित केले आहेत.*



# संपादकीय

वाचक बंधू भगिनी,

दीपावलीचा हा अंक आपल्या हाती देताना आम्हाला अतिशय आनंद होत आहे. राष्ट्रीय विचारधारेवर श्रद्धा असलेल्या मंडळींच्या हाती देशाची धुरा आल्यापासून जागतिक स्तरावर भारताच्या गौरवात, मानसन्मानात वाढ झाली आहे. योग जीवनपद्धतीला जागतिक स्तरावर मिळालेली मान्यता या दृष्टीने महत्त्वाची आहे. गेल्या वर्षी देशात सत्तांतर झाले तेव्हा जागतिक स्तरावरील एका दैनिकाने अतिशय मार्मिक टिपण्णी केली होती. भारत खऱ्या अर्थाने स्वतंत्र झाल्याची भावना त्या दैनिकाने व्यक्त केली होती. देशाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा बदल झाला असल्याने या देशाचे वैचारिक शत्रू चवताळून उठणार हे स्वाभाविकच होते. गेल्या काही दिवसांत देशातील वातावरण गढूळ करण्याचा प्रयत्न काही मंडळींनी नेटाने चालवला आहे.

गेल्या महिन्यात विश्व मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष व ज्येष्ठ विचारवंत प्रा. शेषराव मोरे यांनी महाराष्ट्रातील वैचारिक असहिष्णुतेला 'पुरोगामी दहशतवाद' हे नाव दिले. त्यानंतर महाराष्ट्रातील कथित पुरोगामी बुद्धीजीवींनी शेषराव मोरे यांच्या विरोधात रान उठवले. त्या पार्श्वभूमीवर 'विवेक विचार'ने पुरोगामी दहशतवाद याच विषयावर दीपावली विशेषांक काढायचे ठरवले.

पुरोगामी दहशतवादाचे नेमके स्वरूप कसे असते याचे अतिशय अभ्यासपूर्ण विवेचन ज्येष्ठ विचारवंत भाऊ तोरसेकर यांनी केले आहे. प्रा. शेषराव मोरे यांची विशेष मुलाखत, तरुण विजय, रमेश पतंगे, अरुण करमरकर, तुफैल अहमद आदी मान्यवर विचारवंतांचे अभ्यासपूर्ण लेख यामुळे या विशेषांकाची उंची वाढली आहे.

सेक्युलॅरिझम, पुरोगामीत्वाच्या नावाखाली या देशाची संस्कृती, परंपरा यांना हीन लेखण्याच्या प्रवृत्तीला उघडे पाडणे आवश्यकच बनले आहे. स्वामी विवेकानंदांनी १०० वर्षांपूर्वी हेच कार्य अतिशय प्रभावीपणे जागतिक स्तरावर केले होते. जगाला सहिष्णुतेचा संदेश देणाऱ्या हिंदू धर्माविषयीचे गैरसमज दूर करण्याचे कार्य स्वामी विवेकानंदांनी केले होते. आमचा धर्म सत्य आहे तसे इतरही धर्म सत्य आहेत, अशी भूमिका केवळ हिंदूंचीच आहे. केवळ माझाच धर्म एकमेव खरा अशी एकांगी भूमिका घेणारे एकांतिक धर्मीय धर्मांतरण आणि हिंसेचा आधार घेऊन असहिष्णुतेला खतपाणी घालत आहेत. अशा वेळी धर्मांधता जोपासणाऱ्या शक्तींना पाठिशी घालून विश्वबंधुत्वाचा भाव पसरवणाऱ्या हिंदुत्व तत्त्वज्ञानाला आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करण्याचे काम स्वयंघोषित पुरोगामी करत आहेत. त्यामुळे अधर्माची साथ देणाऱ्या कथित पुरोगामी शक्तींचे स्वरूप समाजासमोर आणणे आवश्यकच ठरते. म्हणूनच विवेक विचार दिवाळी अंकाच्या माध्यमातून तसा प्रयत्न केला आहे. आमचा हा प्रयत्न आपल्याला नक्कीच आवडेल या विश्वासासह हा अंक विनम्रपणे सादर करत आहोत.

प्रकाशाचा संदेश देणाऱ्या दीपावली सणाच्या शुभेच्छा !






# पुरोगामी सेक्युलर दहशतवाद



**भाऊ तोरसेकर**
ज्येष्ठ पत्रकार, मुंबई
९७०२१३४६२४

आपण ज्यांना दहशतवादी, अतिरेकी, जिहादी म्हणून नावे ठेवतो, तेच खरे घातपाती नव्हेत, तर निव्वळ साधने आहेत. खरे जिहादी तुमच्या आमच्यात उजळमाथ्याने वावरत असतात. कधीच हाती हत्यार घेत नाहीत तर नि:शस्त्र साळसूद जीवन जगत असतात. आपल्यालाही नि:शस्त्रपणे जिहादचे बळी व्हायला भाग पाडत असतात. आपला बळी घेणारे हे हत्यार वैचारिक, मानसिक व भावनिक असते. ज्याचा आपल्याला थांगपत्ता नसतो. ते ज्यांना कळत नाही, त्यांना अंदमानच्या विश्व मराठी साहित्य संमेलनात अध्यक्ष प्रा. शेषराव मोरे काय म्हणाले, ते कधीही समजू शकणार नाही.

हल्ली फारसे कुठे डॉ. झाकीर नाईक यांचे व्हिडिओ बघायला मिळत नाहीत. सहासात वर्षांपूर्वी त्यांचा खूप गाजावाजा चालायचा. इंग्रजी वा हिंदीतून अस्खलित उत्तम व्याख्याने देणारा वक्ता म्हणून डॉ. नाईक यांनी अनेकांना थक्क करून भारावून टाकले होते. काही बाबतीत तर अन्य धर्माच्या विद्वानांना चितपट करून त्यांनी इस्लामच कसा जगातला सर्वश्रेष्ठ धर्म आहे, त्याचा देखावा छान उभा केलेला होता. कुठलाही प्रश्न विचारा त्यात अन्य धर्मग्रंथांचेही अचूक संदर्भ देऊन नाईक कोणालाही चकीत करताना बघून, कोणीही भारावून जाणे स्वाभाविक होते. या भारावण्याचे एक तंत्र होते व असते. अन्य धर्मातले सामान्य लोक, त्यात सुशिक्षितही आले, त्यांना आपल्याच धर्माची पुरती जाण नसते. अशा लोकांच्या तोंडावर त्यांच्याच धर्मग्रंथातील 'अमुक अध्याय, तमूक श्लोक' म्हणून काहीही फ़ेकले, की त्यांना चकीत होऊन जाणे भाग असते. त्यांनाच जर असा कुठला अध्याय वा श्लोक आपल्या धर्मग्रंथात असल्याचे ठाऊक नसेल, तर नाईक यांनी बेधडक काहीही ठोकून दिले व त्याचा सोयीचा अर्थ कथन केला, तर आव्हान कोण देणार? मग एकदा समोरचा असा गारद झाला, की त्याचा दूरान्वये नसलेला संदर्भ कुराणाशी जोडून नाईक कुराणच अंतिम असल्याचे बेलाशक दावा करायला मोकळे असायचे. जिंकलेला विजयीवीर असल्यासारखे ते मग कुराण लोकांना दाखवित.

यातले तंत्र लक्षात घेतले पाहिजे. समोरच्याला प्रतिआव्हान वा प्रतिकारापासूनच परावृत्त केले, की पुढली लढाई तुम्ही सहज जिंकू शकता. कारण शक्य असतानाही तुम्ही लढायची इच्छाशक्ती गमावली असल्याने, जिंकणे शक्य असूनही तुम्ही लढू शकत नाही. म्हणूनच तुम्हाला लढण्यापासून परावृत्त करणे, हे सर्वात मोठे युद्धतंत्र असते. डॉ. झाकीर नाईक बौद्धिक पातळीवर हे करायचे तर ब्रिगेडीयर एस. के. मलिक प्रत्यक्ष शस्त्रास्त्रे व युद्धभूमीवर वापरण्याचे तेच तंत्र सांगतात. आपल्या 'कुरानिक कन्सेप्ट ऑफ़ वॉर' या पुस्तकात मलिक यांनी ऐतिहासिक व आधुनिक जिहादची अतिशय सुसंगत अशी मांडणी केली आहे. बंदूक, बॉम्ब वा हत्याराने जिहाद लढला जात नाही. जिहादची लढाई मानसिक पातळीवर चालते आणि त्यात हत्यारांचा मर्यादित वापर त्यातले निव्वळ एक साधन म्हणून कसा करावा, त्याचे सविस्तर वर्णन मलिक यांनी केले आहे. ते समजून घेतले तर लक्षात येईल, की आपण ज्यांना दहशतवादी, अतिरेकी, जिहादी म्हणून नावे ठेवतो, तेच खरे घातपाती नव्हेत, तर निव्वळ साधने आहेत. खरे जिहादी तुमच्या आमच्यात उजळमाथ्याने वावरत असतात. कधीच हाती हत्यार घेत नाहीत तर नि:शस्त्र साळसूद जीवन जगत असतात. आपल्यालाही नि:शस्त्रपणे जिहादचे बळी व्हायला भाग पाडत असतात. आपला बळी घेणारे हे हत्यार वैचारिक, मानसिक व भावनिक असते. ज्याचा आपल्याला थांगपत्ता नसतो. ते ज्यांना कळत नाही, त्यांना अंदमानच्या विश्व मराठी साहित्य संमेलनात अध्यक्ष प्रा. शेषराव मोरे काय म्हणाले, ते कधीही समजू शकणार नाही. म्हणूनच मग अशा लोकांना भारतातले तथाकथित विद्वान, पुरोगामी याकुब मेमनसाठी अश्रू कशाला ढाळतात, त्याचाही उलगडा होणार नाही. कारण असे लोकच मलिक यांच्या व्याख्येतले जिहादी साधन झालेले असतात. साधनाला आपले स्वत:चे काहीही ध्येय, उद्दिष्ट नसते. वापरणाऱ्याचे लक्ष्य हेच साधनाला आपले ध्येय वाटत असते. याचा अर्थ समजून घ्यायचा, तर शेषरावांच्या विधानापूर्वी ब्रिगेडीयर मलिक समजून घेतला पाहिजे. मलिक जिहादची व्याप्ती व तंत्र म्हणून काय सांगतात?

'दहशत माजवा, पण दहशतीखाली दबू नका. जिहादी युद्धाची व्याप्ती अखेरीस मानवी हृदय, मन, आत्मा व श्रद्धा यांच्यापुरती असते. जर शत्रूची श्रद्धा ढासळून टाकली, तरच त्याच्या काळजात धडकी भरवता येते. म्हणजेच त्याला दहशतीच्या प्रभावाखाली आणता येते. म्हणूनच अंतिमत: शत्रूची धर्मश्रद्धा डळमळीत करण्यालाच सर्वाधिक महत्त्व असते. ज्यांच्या

*आत्मा आणि शरीर एकमेकांवर अवलंबून आहेत. एकाशिवाय दुसऱ्याचा विचार करणं केवळ अशक्य आहे.*



मरावे लागले, त्यातून उर्वरित हयात लोक भयभीत होतात, त्याला दहशत म्हणतात. म्हणूनच दहशत म्हणजे हिंसा वा खून नव्हे. दहशत म्हणजे तुम्हाला आपल्या मनातले बोलण्याची, वागण्याची वा अन्य काही पटले नाही, तर प्रतिकार करण्याची हिंमत होऊ नये; अशी भीती तुमच्या मनात रुजवणे म्हणजे दहशतवाद असतो. अशी दहशत कशामुळे निर्माण होऊ शकते आणि कशामुळे ती होऊच शकत नाही, याचाही तपशीलवार खुलासा मलिक यांनी केला आहे. त्याचवेळी दहशत माजवणाऱ्याचे मुख्य प्रभावी हत्यार कुठले, त्याचाही खुलासा केला आहे. मलिक जिहादीच्या हातातल्या हत्याराविषयी बोलत नाहीत, तर त्याच्या भक्कम (धर्म) श्रद्धेला भेदक हत्यार मानतात. दहशत माजवणाऱ्याच्या धर्मश्रद्धा भक्कम व अभेद्य असल्या पाहिजेत आणि ज्याला दहशत घालायची, त्याच्या धर्मश्रद्धा ठिसूळ वा दुर्बळ असल्या पाहिजेत. तरच दहशत माजवता येते. उलट ज्यांच्या धर्मश्रद्धा भक्कम वा पक्क्या आहेत, त्यांच्यावर दहशत काम करत नाही, याचीही ग्वाही मलिक देतात, हे विसरता कामा नये. तोच निकष लावून आपण भारतात धुमाकूळ घालणाऱ्या जिहादकडे बघायला हवे आणि त्याच निकषावर शेषरावांच्या पुरोगामी दहशतवाद विधानाचे विवेचन करायला हवे.

धार्मिक श्रद्धा पक्क्या व भक्कम असतात, त्यांच्यावर दहशतीचा कुठलाही परिणाम होत नाही. म्हणूनच दुबळी धर्मश्रद्धा दहशतीला आमंत्रण देत असते. त्यामुळेच जिहादच्या पूर्वतयारीसाठी मुस्लिमेतर शत्रूच्या धर्मश्रद्धा डळमळीत करणे अत्यावश्यक असते. पण त्याचवेळी मुस्लिमांच्या धर्मश्रद्धा कडव्या करण्याचीही गरज असते. मानसिक दुबळेपणा तात्पुरता असतो, पण धार्मिक श्रद्धेचा दुबळेपणा कायमस्वरूपी असतो. मानवी आत्म्याला फ़क्त दहशतच स्पर्श करू शकते.'

इथे एक गोष्ट लक्षात घ्यावी लागेल, की जिहादची लढाई धर्माची नाही हे दाखवण्यासाठी आपल्याकडले व जगातले पुरोगामी त्याला दहशतवाद असे नाव देतात. पण प्रत्यक्षात दहशतवाद व जिहाद यात तसूभर फ़रक नाही, असेच मलिक यांचे स्पष्टीकरण आहे. पण त्यात त्यांनी धर्माविषयी केलेला खुलासा अधिक बोलका आहे. त्यासाठी त्यांनी पुस्तकात थेट कुराण या धर्मग्रंथाचाच आधार घेतलेला आहे. दहशत कशी माजवता येते आणि त्यात हत्याराला वा हिंसेला महत्व नाही, तर मनातली घट्ट भीती म्हणजे दहशत, असाच तो खुलासा आहे. कुणाला मारून दहशत माजवता येत नाही. तर दहशत हे माणसावर जीवंतपणी चालणारे हत्यार आहे. मेलेल्याला कुठल्या भावना नसतात की भीती वाटण्याचा संबंध येत नाही. दहशत ही जीवंत माणसाला घालता येते. पण अन्य कुणाला कशामुळे

आता भारतातल्या अगदी पुरोगामी मुस्लिमांकडे आपण आधी बघू. ते कधीच आपल्या धर्मश्रद्धा वा प्रथापरंपरांची विटंबना सहन करत नाहीत किंवा तसे झाल्यास त्याचे समर्थन करत नाहीत. शाहिद सिद्दीकीपासून उपराष्ट्रपती हमीद अन्सारीपर्यंत कुणाला कधी इस्लामम धील कालबाह्य प्रथा, कर्मकांडाची हेटाळणी करताना तुम्ही बघितले वा ऐकले आहे काय? पुरोगामी मुस्लिम विचारवंत डॉ. रफ़िक झकेरियांनी तर 'अब्दुल कलाम यांना कृपया मुस्लिम म्हणू नका' असा लेखच लिहिला होता. कारण प्रतिदिन पाचवेळा नमाज पढत नाहीत, म्हणून कलाम मुस्लिम नसतात, अशी झकेरिया नामक पुरोगामी

मुस्लिम विचारवंताची धारणा होती. म्हणजेच पुरोगामी असण्यासाठी झकेरियांना नमाज सोडण्याची गरज नसते. दुसरीकडे स्वत:ला पुरोगामी म्हणवून घेणाऱ्या नाममात्र हिंदू विचारवंतांकडे बघा. आपण कसे कुठलेही हिंदू धर्मशास्त्र वा कर्मकांड, प्रथापरंपरा पाळत नाही, हे सांगण्याची स्पर्धा त्यांच्यात चालते. तिथेच हा विषय संपत नाही, तर देवाची मूर्ती वा देवळांची विटंबना झाली, म्हणजे त्याचे समर्थन करायला सर्वात आधी हेच हिंदू पुरोगामी पुढाकार घेतात. मात्र त्याचवेळी त्यांना मुस्लिम कर्मकांड करणारे मुस्लिम पुरोगामी विचारवंत सेक्युलर वाटतात. तशा मुस्लिमांना जाब विचारण्याची हिंमत नसलेले हिंदू पुरोगामी, हिंदूंना मात्र कालबाह्य कर्मकांडाचा जाब विचारताना दिसतील. मुस्लिम पुरोगामी असला तरी मुस्लिम धर्ममार्तंड त्यांच्या विरोधात फ़तवे काढत नाहीत कारण त्याचे पुरोगामित्व देखावा आहे, याची त्यांना पूर्ण जाणीव असते. आणि आपला पुरोगामीपणा दाखवायला इस्लामविषयी अवाक्षर बोललो तर आपली खैर नाही, याची अशा मुस्लिम पुरोगामी विचारवंतांना खात्री असते. म्हणूनच ते हिरीरीने पुरोगामित्व मांडताना कुराण कसे पुरोगामी आहे, त्याचे दाखले देतात. पण त्यातले प्रतिगामी ठरू शकतील असे उतारे बोलायची हिंमत करत नाहीत. थोडक्यात पुरोगामी मुस्लिम विचारवंतही कडवा मुस्लिमच असतो आणि त्याच्या धर्मश्रद्धा पक्क्या व भक्कम असल्याची साक्ष उक्ती, कृतीतून देत असतो. उलट आपल्या धर्मश्रद्धा पूर्णपणे ढासळल्या आहेत, ठिसूळ झाल्या आहेत, याची पदोपदी ग्वाही देणारे स्वत:ला हिंदू पुरोगामी म्हणून मिरवत असतात. ज्यांचा हिंदू धर्मश्रद्धेशी काडीमात्र संबंध उरलेला नाही. ज्यांना हिंदू धर्माशी कसले सोयरसुतक नाही, असे लोक पुरोगामी हिंदू म्हणून मिरवत असतात.

झकेरिया नमाज वेळीच पढत नाही म्हणून जाहीर लेख लिहून डॉ. कलाम मुस्लिम नाहीत, अशी द्वाही फिरवतात. पण सेक्युलर पुरोगामी जाणत्यांपैकी कोणी झकेरियांचा निषेध केल्याचे आपण ऐकले आहे काय? पण तेच लोक इस्रोचे शास्त्रज्ञ संशोधक तिरूपतीला आशीर्वाद घ्यायला पोहोचले, की नाराजीचा गळा काढतात. असे कशामुळे होते? हा भेदभाव कशाला होतो? झकेरियांना धर्मांध म्हणायची भीती असलेले हिंदू पुरोगामी बिनधास्त शास्त्रज्ञांना प्रतिगामी कशामुळे म्हणतात? तर ती सक्ती असते. तसे आपण केले नाही तर आपल्यालाही प्रतिगामी ठरवले जाईल, अशी दहशत आजकाल बहुतेक विचारवंतांमध्ये माजलेली आहे.

आता गंमत बघा. झकेरिया नमाज वेळीच पढत नाही म्हणून जाहीर लेख लिहून डॉ. कलाम मुस्लिम नाहीत, अशी द्वाही फ़िरवतात. पण सेक्युलर पुरोगामी जाणत्यांपैकी कोणी झकेरियांचा निषेध केल्याचे आपण ऐकले आहे काय? पण तेच लोक इस्रोचे शास्त्रज्ञ संशोधक तिरूपतीला आशीर्वाद घ्यायला पोहोचले, की नाराजीचा गळा काढतात. असे कशामुळे होते? हा भेदभाव कशाला होतो? झकेरियांना धर्मांध म्हणायची भीती असलेले हिंदू पुरोगामी बिनधास्त शास्त्रज्ञांना प्रतिगामी कशामुळे म्हणतात? तर ती सक्ती असते. तसे आपण केले नाही तर आपल्यालाही प्रतिगामी ठरवले जाईल, अशी दहशत आजकाल बहुतेक विचारवंतांमध्ये माजलेली आहे. मुस्लिम असायचे तर दिवसात पाच ठरलेल्या वेळी नमाज पढलाच पाहिजे. अन्यथा तुम्ही मुस्लिम नसता. नेमकी तशीच अवस्था आता आपल्याला पुरोगामी क्षेत्रात दिसून येईल. तुम्हाला पुरोगामी दिसायचे असेल वा सेक्युलर म्हणून मान्यता हवी असेल, तर हिंदूंना शिव्या घालाव्या, त्यांची टवाळी करावी. सावरकर, संघ, शिवसेना सण, समारंभ यांची यथेच्छ हेटाळणी व्रतस्थ असल्याप्रमाणे केली पाहिजे. तसे नसेल तर (नमाज न करणाऱ्या कलामांप्रमाणे इथे) तुम्ही

*जीवनातील वास्तवाकडे दुर्लक्ष झालं तर आपल्या वाट्याला केवळ अपयश येईल.*



तमाम पुरोगामी तुमच्यावर तुटून पडणार. जसे विनाविलंब डझनावारी पोपटपंची करणारे सेक्युलर बुद्धीमंत शेषराव मोरे यांच्या विधानावर तुटून पडले. बारकाईने बघितले तर शेषरावांवर टिकेची झोड उठवणाऱ्या अशा घाऊक बुद्धीमंतांनी आपल्या कृतीतूनच शेषरावांचे शब्द खरे करून दाखवले. असे अंगावर येऊन त्यांना वेडपट वा संभ्रमित विचारांचे ठरवण्याचा उद्योग दहशत नाही काय? तुम्हाला विचारवंत म्हणून रहायचे असेल व मान्यता हवी असेल, तर आमच्या धाकात राहिले पाहिजे. सेक्युलर थोतांडाला धरून लिहिले व बोलले पाहिजे. ती मर्यादा ओलांडली तर विचारवंत म्हणून संपलात. ह्याला दहशत नव्हे तर काय म्हणायचे?

पुरोगामी रहात नाही. तमाम पुरोगामी तुमच्यावर तुटून पडणार. जसे विनाविलंब डझनावारी पोपटपंची करणारे सेक्युलर बुद्धीमंत शेषराव मोरे यांच्या विधानावर तुटून पडले. बारकाईने बघितले तर शेषरावांवर टिकेची झोड उठवणाऱ्या अशा घाऊक बुद्धीमंतांनी आपल्या कृतीतूनच शेषरावांचे शब्द खरे करून दाखवले. असे अंगावर येऊन त्यांना वेडपट वा संभ्रमित विचारांचे ठरवण्याचा उद्योग दहशत नाही काय? तुम्हाला विचारवंत म्हणून रहायचे असेल व मान्यता हवी असेल, तर आमच्या धाकात राहिले पाहिजे. सेक्युलर थोतांडाला धरून लिहिले व बोलले पाहिजे. ती मर्यादा ओलांडली तर विचारवंत म्हणून संपलात. ह्याला दहशत नव्हे तर काय म्हणायचे? जी प्रत्यक्षात हत्या करीत नाही, पण ठरविक बुद्धीवादी क्षेत्रातून तुमचे अस्तित्वच पुसायचे कृत्य करत असते.

शेषराव यांनी वेगळा मुद्दा वा वेगळा विचार मांडला आहे, त्याची छाननीही कोणाला करावीशी वाटली नाही. इस्लाममध्ये वा कुराणातल्या गोष्टींचा खरेखोटेपणा कोणी तपासून बघायला तयार असतो का? तसा नुसता प्रयत्न करा, लगेच त्याला धर्मातून हाकलल्याचे फ़तवे निघतात. त्याच्या हत्येचे फ़तवे काढले जातात. सलमान खान लालबागच्या राजाचे दर्शन घ्यायला गेल्यावर त्याला इस्लाममधून हाकलल्याचे फ़तवे निघाले. त्यापेक्षा शेषरावांवर तुटून पडलेली टोळधाड किंचित वेगळी होती काय? हे खरे जिहादी आहेत. माझा शेषरावांच्या आरोपाला एकच आक्षेप आहे, की त्यांनी वापरलेला 'दहशतवाद' हा शब्द मला मान्य नाही. त्यापेक्षा 'पुरोगामी जिहाद' असा शब्द त्यांनी योजणे योग्य व रास्त ठरले असते. आज भारतामध्ये वा जगाच्या पाठीवर पुरोगामी वा सेक्युलर म्हणून जे काही चालले आहे, तोच प्रत्यक्षातला जिहाद आहे. म्हणजे असे की तोयबा, अलकायदा किंवा इसिस यासारख्या संघटनांना जो हिंसक अमानुष इस्लामचा प्रभाव जगभर निर्माण करायचा आहे, त्याला पोषक परिस्थिती निर्माण करायचे प्राथमिक कार्य जगभरचे पुरोगामी निष्ठापूर्वक करीत आहेत. कुठल्याही अन्य सेक्युलर उदारमतवादी विचारवंतापेक्षा आजच्या पुरोगामी पोपटांकडून ब्रिगेडीयर मलिक यांच्या विचारांचा व तंत्राचा अवलंब होताना दिसतो आहे. मलिक काय सांगतात? शत्रूच्या धर्मश्रद्धा ढासळून टाका. त्याच्या श्रद्धा भक्कम असतील, तर दहशत त्याच्या मनाला स्पर्शही करू शकणार नाही. याची प्रचिती आपल्याला इस्त्रायल या इवल्या देशाकडून येऊ शकते. साठ लाखांचा देश भोवताली करोडो अरब मुस्लिमांनी घेरला आहे. पण मोजकी इस्त्रायली सेना त्यांना पुरून उरलेली आहे. कारण तिथले ज्यूधर्मिय आपल्या धर्मश्रद्धा भक्कम ठेवून राष्ट्र म्हणून उभे आहेत. याच्या उलट अमेरिका वा रशियापासून अन्य भलेभक्कम देश मात्र आपल्या धर्मश्रद्धा ठिसूळ करून बसलेत आणि मूठभर जिहादी त्यांना सळो की पळो करून सोडताना दिसतात. मलिक यांच्या उपरोक्त उताऱ्याची तिथे प्रचिती येते. या भलेभक्कम देशांना असे पोखरण्याचे काम

*वास्तवाचं भान ठेवून त्यातून पूर्ण समाधान मिळेल असं हेतुपूर्ण जीवन आपण जगलं पाहिजे.*

तिथल्या पुरोगामी, उदारमतवादी सेक्युलर विचारवंतांनी केले. जे काम जिहादी लढवय्यांसाठी अत्यंत मोलाचे असल्याचे मलिक सांगतात.

भारतात आता त्याच्याही पुढली पायरी गाठली गेली आहे. अलिकडे तुम्ही बारकाईने पुरोगामी सेक्युलर युक्तीवाद ऐकलात वा तपासलात, तर राष्ट्रवादाची टवाळी केली जात असते. हिंदुत्व किंवा धर्मापेक्षा हिंदुत्ववाद्यांच्या राष्ट्रवादी भूमिकेवर प्रखर हल्ले होतात. याचेही विश्लेषण होण्याची गरज आहे. इतिहास तपासला तर हिंदू धर्मासाठी कोणी लढला वा धर्मप्रसारासाठी हिंदूंनी युद्ध केले असे आढळत नाही. हिंदू राजाने कधी आपला धर्म प्रजेवर, रयतेवर सक्तीने लादल्याचे दिसत नाही. किंबहूना धर्माच्या बाबतीत इथे कुठलीही सक्ती नव्हती आणि अन्य धर्मांप्रमाणे हिंदू हा कधीही रिलीजन म्हणजे संघटित धर्म संघटना राहिलेली नाही. शेकडो धर्मांचे साधर्म्य महासंघटन यापेक्षा हिंदू लोकसंख्येचे संघटित धर्म असे स्वरूप नव्हते. जातिपातीच्या विविध गटात उपगटात इथली लोकसंख्या आपापले हेवेदावे जपत विभागलेली राहिली. म्हणूनच धर्म म्हणून कुठल्या लढाया होऊ शकल्या नाहीत. कुठल्याही राजाच्या सेनेत कुठल्याही धर्माचे सैनिक असायचे. पण इस्लामी सेना इथे आक्रमण करून आल्यावर सेनेला धर्माच्या मर्यादा आल्या. धर्माच्या लढाया होऊ लागल्या. साहजिकच धर्मासाठी लढणे वा शस्त्राच्या बळावर धर्मप्रसार ही कल्पना इथे रुजलेली दिसणार नाही. मग धर्मश्रद्धेसाठी हिंदूंना लढणे कसे शक्य आहे? हिंदू राज्य कसे शक्य आहे? पण राष्ट्र नावाची संकल्पना इथे दीर्घकाळ रुजलेली आहे आणि तिनेच कायम लोकसंख्येवर धर्मापेक्षा अधिक प्रभूत्व गाजवले आहे. म्हणूनच इस्लामी असोत किंवा पुढल्या काळात युरोपियन असोत, त्यांचे धर्म भिन्न असले तरी सर्वच सत्ताधीशांच्या फ़ौजेमध्ये कुठल्याही धर्माचे सैनिक दिसायचे. आपण राज्य, राष्ट्रासाठी लढतोय अशी धारणा त्यात होती. हिंदू समाजाचे तेच वैशिष्ट्य आहे. ते धर्मासाठी लढू शकत नाहीत. कारण धर्म ही व्यक्तीगत श्रद्धा मानली व जपली गेली आहे. पण राष्ट्र ही सामूहिक धारणा आहे. सहाजिकच अयोध्येतील राममंदिर उभारायला जितका हिंदू पुढे सरसावत नाही तितका तो काश्मिरसाठी विचलित होतो. थोडक्यात रिलिजन या अर्थाने हिंदूंची श्रद्धा राष्ट्र या संकल्पनेशी अधिक घट्ट निगडित आहे. त्यासाठी तो लढायला, मरायला सिद्ध होतो. मग श्रद्धेवर हल्ला चढवून अशा समाजाला दुबळा करायचा असेल, तर हिंदूधर्म नव्हे तर राष्ट्रवादावर हल्ला करावा लागणार ना? नेमके ते काम आजकाल पुरोगामी सेक्युलर लोक करताना दिसतील. पाकिस्तानविषयी प्रेम असल्याने तुम्ही घातक नसता, पण पाकिस्तानचा तुम्हाला राग आला तर तुमच्यापासून देशाला व पर्यायाने भारताला धोका असल्याचे तावातावाने मांडले जाईल.

शिवसेनाप्रमुख पाकिस्तानच्या क्रिकेट संघाला इथे येऊ देणार नाही म्हणाले की, पुरोगाम्यांचे पित्त खवळलेले तुम्ही बघितले असेल. लगेच त्याला ते धर्मद्वेष ठरवणार. खेळात राजकारण कशाला, असा प्रश्न विचारणार. पण त्याच क्रिकेटच्या खेळात कित्येक वर्षे दक्षिण आफ्रिकेला बहिष्कृत करण्यात आले तेव्हा ते खेळातले राजकारण नव्हते का? पाक सेना वा तिथले घातपाती भारतीय सैनिकांचा जीव घेतात, मुंडके कापून नेतात म्हणून कुठला पुरोगामी विचलित होणार नाही. उलट पाकप्रेमाची ग्वाही देताना दिसेल. पण कोणी पाकविषयी राग करू लागला तर त्याच्या राष्ट्रप्रेमाची खिल्ली उडवण्यात सगळे पुरोगामी पुढाकार घेताना दिसतील. इथे लक्षात येते की हल्ली हिंदू धर्मापेक्षा तुमचा राष्ट्रप्रेम, राष्ट्रवाद खिळखिळा करण्यासाठी जोर लावलेला दिसेल. कारण धर्मासाठी लढत नाही, तोच हिंदू राष्ट्रासाठी लढणार याची पाकिस्तानला खात्री झालेली आहे. मग भारत नावाच्या हिंदूबहुल राष्ट्राला पराभूत करायचे असेल, तर त्याच्या राष्ट्रविषयक श्रद्धांना खच्ची केले पाहिजे. नेमके तमाम भारतीय पुरोगामी सेक्युलर त्याच कामाला जुंपलेले दिसतील. म्हणजे असे

की पाकिस्तानी हेरसंस्थेच्या माजी प्रमुखांच्या संस्थेने शांतता परिसंवाद आयोजित करायचा आणि त्याला दिलीप पाडगावकर, बरखा दत्त, मणिशंकर अय्यर, सिद्धार्थ वरदराजन अशी एकाहून एक पुरोगामी मंडळी हजेरी लावणार. पाक हेरखात्याशी मैत्री करणाऱ्याचा या देशाला धोका नसतो आणि त्यांच्याविषयी शंका घेणाऱ्यांपासून भारताला धोका असतो. कसा विचित्र युक्तीवाद आहे ना? असो! मुद्दा इतकाच की मलिक यांच्या निकष व तत्त्वानुसार इथले पुरोगामी वागताना दिसतील. ते मुस्लिमांच्या धर्मनिष्ठा व श्रद्धा जपताना, चुचकारताना दिसतील. उलट हिंदूंच्या धर्मनिष्ठा सोडाच राष्ट्रवादालाही आव्हान देताना दिसतील. याला जिहाद म्हणतात. जो दिसायला युक्तीवाद असतो, पण प्रत्यक्षात इस्लामी जिहादसाठी पोषक परिस्थिती निर्माण करताना दिसेल. चुकून तुमचा कुणा हिंदूत्ववाद्याशी संबंध आला तर तुम्ही देशद्रोही ठरवले जाता आणि काश्मिरातील फुटीरवादी वा घातपातात सापडलेल्यासाठी अश्रू ढाळणेही पुरोगामी असते.




ही पुरोगामी दहशत किती व कशी काम करते? मुंबईत शेकडो लोकांवर बेछूट गोळ्या घालणाऱ्या अजमल कसाबलाही त्याचा बचाव मांडण्यासाठी इथल्या कोर्टात वकील मिळू शकला. त्याचे वकीलपत्र घेणाऱ्या एका महिलेवर शिवसैनिकांनी झोड उठवली म्हणून कल्लोळ करणारे कोण होते? ज्याला प्रत्यक्ष गोळ्या झाडून तुकाराम ओंबळेंचा जीव घेताना अवघ्या जगाने थेट प्रक्षेपणातून बघितले होते, त्याचे वकीलपत्र घेण्य़ासाठी कुठल्या वकील संघटनेने कुणावर आक्षेप घेतला नाही. किंबहूना त्याचे वकीलपत्र घेणाऱ्या वकीलाच्या बचावासाठी तमाम पुरोगामी हिरीरीने पुढे आले होते ना? पण कॉम्रेड पानसरेंच्या हत्येतला संशयित आरोपी समीर गायकवाड याचे वकीलपत्र घेण्यावरून काही वकिलांना धारेवर धरण्यात आले. त्याला दहशत म्हणतात. हीच ती पुरोगामी दहशत असते. आम्ही ज्याला गुन्हेगार व दोषी मानला आहे त्याच्याविरोधात पुरावे, साक्षी आहेत किंवा नाहीत याविषयी शंका घेणेही जिथे गुन्हा मानला जातो, त्याला दहशत नाहीतर काय म्हणायचे? आपल्या वकिलीपेशा वा लोकशाहीतील न्यायाचे तत्त्वही पाळायला वकिलांना घाबरवून सोडणारी असते ती दहशत असते. ती कोणावर गोळ्या झाडत नाही की कोणाला थेट इजा करत नाही, तर जगणे असह्य करून सोडण्याच्या धमक्या देते, धाक घालते. शेषराव कुठल्या दहशतीबद्दल बोलतात, त्याचा हा भक्कम पुरावा आहे. तसे नसते तर समीर गायकवाडला न्याय मागण्याचा वा कोर्टात आपले निरपराधीत्व सिद्ध करण्याचा अधिकार असल्याचे सांगायला सर्वात आधी उदारमतवादी पुरोगामी पुढे यायला हवे होते. नसतील तर कसाबच्या वकीलपत्रानंतर गदारोळ करणारे शिवसैनिक आणि आजचे बुद्धिमान पुरोगामी यांच्यात कितीसा फ़रक उरतो? मग त्यांच्याच आक्षेपानुसार शिवसेनेची दहशत असेल, तर पुरोगाम्यांची चालते ती दहशत नाही काय?

पण शिवसेनेची दहशत आणि पुरोगामी दहशत यात एक मुलभूत फ़रक आहे. पहिली दहशत ही या भूमीच्या राष्ट्रप्रेमातून आलेली आहे, तर दुसरी दहशत राष्ट्रप्रेमाला

सुरूंग लावणारी आहे. कारण ही दुसरी दहशत हाती हत्यार घेत नाही, तर भावनिक, वैचारिक भूमिकेवर आघात करून तिलाच जायबंदी करून टाकते आणि पर्यायाने मग खरे जिहादी वा मुजाहिदीन असतात, त्यांचे काम सोपे करून टाकते. हे काम कसे सोपे होते? नुसती आवई उठवली तरी दुबळ्या मानसिकतेची माणसे घाबरून जातात. काही वर्षांपूर्वी चेन्नई येथील अमेरिकन वकिलातीमध्ये एक निनावी फ़ोन आला. त्यांच्या वकीलातीत व संसदेत बॉम्ब ठेवला असून अमुक वाजता त्याचा स्फ़ोट व्हायचा आहे. विनाविलंब ही माहिती केंद्राला कळवण्यात आली आणि सभापती सोमनाथ चॅटर्जी यांनी कुठलीही सूचना न देता कामकाज थांबवून सदस्यांना इमारतीबाहेर जायला सांगितले. संसद भवनाची झडती सुरू झाली. भयभीत संसद सदस्य घाबऱ्याघुबऱ्या सैरावैरा पळत सुटले. धापा टाकत परिसराच्या बाहेर गेले. त्यात तथ्य नव्हते. तपास केल्यावर अफ़वा खोटी ठरली. पण तिने जो परिणाम साधला होता, त्याला दहशत म्हणतात. जिच्यासाठी कुठले हत्यार लागत नाही, तर तुमच्या मनातली भीती-भयगंडच तुम्हाला सैरभैर करून टाकतो. ही भीती म्हणजे आत्मविश्वासाची पोकळी असते. आपल्या सुरक्षा व्यवस्थेवरची श्रद्धा भक्कम असेल, तर तुम्ही जीव घेऊन पळत सुटणार नाही. जशी गुजरातच्या दंगलीतही पिडलेल्या मुस्लिमांची भारतीय कायदा, न्यायावर पक्की श्रद्धा आहे. त्यांना कितीही बळी म्हणून दाखवले गेले तरी कोणी गुजरात सोडला नाही. पण काश्मिरातून पाच लाख पंडित मात्र पिढीजात घरदार सोडून स्वदेशात परागंदा जीवन कंठत आहेत. त्याला दहशत म्हणतात. गुजरातच्या मुस्लिम लोकसंख्येचा आजही आपल्या हिंदू शेजाऱ्यांवर आणि इथल्या सरकारवर विश्वास आहे, श्रद्धा आहे. म्हणून त्यांना तिथून परागंदा व्हायची इच्छा झालेली नाही. उलट मुस्लिम राज्यकर्ते असूनही इराक-सिरीयातील मुस्लिम मात्र घरदार सोडून पळालेत, पळत आहेत. काश्मिरातून पंडित पळाले आहेत. दहशत त्याला म्हणतात.

आजकाल कोणी आपले मत स्पष्टपणे मांडू लागला तर त्याच्यावर जे बौद्धिक म्हणून हल्ले होतात व त्याला वेडाखुळा ठरवण्याचा हल्ला सुरू होतो, तोही जिहादपूर्व दहशतवाद असतो. मध्यंतरी काही सेक्युलर शहाण्यांनी भाजपाची सत्ता आल्यावर त्यांच्यापाशी कुणी उजवे विचारवंतच नाहीत, अशी एक नवी अफ़वा उभी केली. कोणालाही विचारवंत कोणी ठरवायचे? जे कोणी भाजपा वा उजव्या विचारांचे असतील, किंवा यांच्या पुरोगामी पठडीत बसणारे नसतील, त्यांना विचारवंत ठरवणार कोण? डाव्या विचारांचे असाल तरच तुम्हाला विचारवंत म्हणून मान्यता मिळेल. आणि त्यापेक्षा वेगळ्या पठडीचा नुसता उल्लेख केलात, तरी तुम्ही मुर्ख असाच निकष वा सिद्धांत असेल, तर उजवे विचारवंत असणारच कसे? मग डावी पोपटपंची करणारे कोणीही भुरटे विचारवंत म्हणून पुढे आणायचे, त्यांचे देव्हारे माजवायचे आणि त्यांनी केलेल्या खुळेपणाचेही कौतुक करीत रहायचे. सहाजिकच अशा परिस्थितीत ज्याला तो मानमरातब हवा असेल, त्याला त्याच वेडाचारात सहभागी व्हावेच लागते. नसेल तर मग बहिष्कृत व्हायची हिंमत दाखवावी लागते. शेषराव मोरे यांनी ती हिंमत कायम दाखवली आहे. त्यांच्यासारखे अनेकजण आहेत. ज्यांना डाव्यांच्या पुरोगामी दहशतवादाने कधी विचारवंत म्हणून मान्यताच दिलेली नाही. आणि मग म्हणायचे, उजवे विचारवंतच तयार केलेले नाहीत. थोडक्यात आजचा पुरोगामीपणा म्हणजे एकप्रकारचा इस्लामी पंथ झालेला आहे. एकच ईश्वर आहे आणि तो म्हणजे अल्लाह आणि त्याच्याखेरीज दुसरा कोणीही नाही. पुन्हा म्हणायचे दुसरा ईश्वर असेल तर दाखवा. पण असला तरी तो बघायची वा समजून घेण्याची तयारी तर पाहिजे. त्यासाठी बुद्धी व तर्कशास्त्र जागेवर शाबुत असायला हवे. पुरोगामी चौकटीत बसणार नसेल, तो विचारच नाही. तर उजवे-डावे करण्याचा पोरखेळ तरी कशाला? पण तो चालतो आणि तोही दहशतीने लादला जातो.

*ज्या अभिलाषा आनंदामध्ये परिणत होतात त्यांच्यातच सर्व सुखदु:खांचं मूळ सामावलेलं आहे.*

कालपरवा उत्तर प्रदेशात एका वस्तीमध्ये गोमांस खाल्ल्याच्या संशयावरून जमावाने एका निष्पाप मुस्लिमाची हत्या केली. विनाविलंब त्यात उडी घेऊन शोभा डे नामक मुर्ख बाईने आपणही गोमांस खाल्लेले आहे आपलीही हत्या करा, असला तमाशा मांडला. इतकीच जमावाकडून मरायची हौस आलेली असेल, तर इस्लामी धर्मग्रंथाचा अवमान करून आपले निधर्मीत्व किंवा पुरोगामित्व शोभा डे सिद्ध करू शकतात ना? जमाव कसा अंगावर येतो आणि कसा पशूवत वागतो, त्याचा 'जीताजागता' अनुभव त्यांना मिळू शकतो. आव्हान त्यांना द्यायचे असते, जे अशी आव्हाने स्वीकारायला उत्सुक, उतावळे असतात. जे आव्हान घेतच नाहीत, अशा हिंदूंना आव्हान देण्यातला पुरूषार्थ फ़सवा आणि बोगस असतो. तस्लिमा नसरीन नास्तिक आहे आणि तिला कशामुळे जीव मुठीत धरून दडी मारून बसावे लागते, याची माहिती शोभाताईंना नाही असे कोणाला म्हणायचे आहे काय? १९८० पर्यंत मस्त फ़ॅशनेबल कपडे परिधान करून मिरवणाऱ्या इराणी वा अफ़गाणी महिलांना आज ज्या बुरख्यात कोंडले आहे, त्यांची तशी अवस्था कशामुळे वा कोणामुळे झाली, याची अक्कल इतक्या शिकल्यासवरल्या महिलेला नसेल असे कोणाला म्हणायचे आहे काय? पण ते सत्य बोलायची हिंमत गमावली, मग माणूस पुरोगामी होत असतो. पण नाटके करायची व त्याच्या आडून जिहाद चालवायचा, असे एकूण तंत्र आहे. त्यात खऱ्या जिहादींना बळीचे बकरे तयार करून देण्याची बहुमोल कामगिरी पुरोगामी बजावत असतात. जिहादी हिंसा करतात आणि पुरोगामी दहशत माजवतात. समाजमनात सत्य बोलण्याचे, वागण्याचे भय निर्माण करण्याला दहशत म्हणतात. त्याचाच अनुभव आपण घेत असतो. तो शेषराव मोरे यांना बौद्धिक, साहित्यिक प्रांतामध्ये येत असतो, आपल्याला तो विविध क्षेत्रात अनुभवास येत असतो. ***






# पुरोगामी कंपूचा मतलबी व्यवहार



अरूण करमरकर
ज्येष्ठ पत्रकार व
तरुण भारतचे माजी संपादक
ठाणे. ९३२१२५९९४९

प्रख्यात बंगाली लेखिका तस्लिमा नसरीन यांची एक मुलाखत नुकतीच दि. १७ ऑक्टोबरच्या 'टाईम्स ऑफ इंडिया' या इंग्रजी वृत्तपत्रात प्रसिद्ध झाली आहे. सागरिका घोष यांनी घेतलेली ही मुलाखत आणि ती टाईम्स ऑफ इंडियातून प्रसिद्ध होणे हा एक विचित्र योग वाटावा अशी मते तस्लीमा नसरीन यांनी या मुलाखतीत स्पष्टपणे व्यक्त केली आहेत. संदर्भ आहे तो अलिकडच्या काळात अनेक साहित्यिकांनी, त्यांना मिळालेले साहित्य अकादमीचे पुरस्कार परत करण्याच्या उचललेल्या पावलाचा. कारण देशात पसरत चाललेल्या तथाकथित असहिष्णू वातावरणाचे, त्या वातावरणाला केंद्रात (आणि राज्यातही) विधीवत् निवडून आलेले सरकार जबाबदार असल्याच्या मल्लिनाथीचे आणि पुरस्कार परत केले ते मात्र साहित्य अकादमी या गैरसरकारी, निखळ वाङ्मयीन संस्थेने दिलेले - असा हा 'आग रामेश्वरी...' बाणा 'पुरोगामी' साहित्यिकांनी अंगिकारला आहे. त्यांच्या या बाण्याच्या संदर्भात तस्लिमा नसरीन यांनी व्यक्त केलेल्या मतांचा हा सारांश लक्षात घेण्यासारखा आहे. तस्लिमा म्हणतात, 'पश्चिम बंगालमध्ये माझ्या पुस्तकावर बंदी घातली गेली तेव्हा बहुतांश साहित्यिक (मूग गिळून) गप्प बसले होते. माझी बंगालमधून हकालपट्टी करण्यात

*ध्येयहीन माणूस म्हणजे समाजाला मिळालेला शापच ! ध्येय लौकिक असो वा पारलौकिक, माणसाने त्यासाठी सपाटून प्रयत्न केले पाहिजेत !*

आली, दिल्लीत मला कित्येक महिने 'नजरकैदेत' ठेवण्यात आले, दूरदर्शनवरील माझ्या दीर्घ मालिकेवर बंदी घालण्यात आली, मला देश सोडण्यास भाग पाडण्यात आले, भारतातील मौलवींनी माझ्याविरुद्ध फतवे जाहीर केले... या प्रत्येक प्रसंगी साहित्यिकांनी मौनच बाळगले. या देशात आश्रय मिळण्याच्या माझ्या हक्कासाठी आणि माझ्या अभिव्यक्ती स्वातंत्र्याच्या जपणूकीसाठी मी एकाकी लढा देत आहे. पण माझ्या बाजूने एकही साहित्यिक उभा तर राहिला नाहीच; उलट सुनील गांगुली, शंख घोष यांच्यासारख्या 'मान्यवर' लेखकांनी माझ्या पुस्तकांवर बंदी घालण्याचे आवाहन तत्कालीन मुख्यमंत्री बुद्धदेव भट्टाचार्य यांना केले...!' याच मुलाखतीत तस्लिमा नसरीन यांनी भारतातल्या 'सेक्युलर पुरोगामी' वर्तुळांवर दुटप्पीपणाचा स्पष्ट आरोप केला आहे. 'सेक्युलॅरिझमचा उद्घोष करणारे येथील बहुतांश लोक हिंदूविरोधी आणि मुस्लिम- धार्जिणे आहेत... हिंदूंकडून झालेल्या हिंसक घटनांचा ते (तत्परतेने) निषेध करतात, पण मुस्लीम मूलतत्त्ववाद्यांच्या घृणास्पद हिंसाचाराचे मात्र अप्रत्यक्षरीत्या समर्थन आणि संरक्षण करतात... राजकारणी मतांसाठी मुस्लीम समुदायाचे लांगूलचालन करतात - त्यातून मुस्लिमांवर सवलतींचा इतका वर्षाव केला जातो की हिंदू (याच पक्षपातामुळे) बिथरतात... काही वेळेला मुस्लिमांवर - केवळ ते मुसलमान आहेत म्हणून - अत्याचार होतो हे खरे आहे; पण ते तर अन्य धार्मिक समुदायांबाबतही घडते. २०१३ मध्ये पश्चिम बंगालमध्ये मुस्लिम अतिरेक्यांनी हिंदूंचे अख्खे गाव जाळून टाकले होते. भारतात मुस्लिमांवर खरोखरच असह्य अत्याचार होत असते तर ते देश सोडून शेजारी मुस्लिम देशात (कधीच) निघून गेले असते- (उलट) फाळणीच्या काळापासून पाकिस्तान आणि बांगला देशात अल्पसंख्य असलेल्या हिंदूंवर सातत्याने तेथून परागंदा होण्याची पाळी येत असल्याचेच दिसून येत आहे...!'

भारतातील सेक्युलर, पुरोगामी मंडळींच्या मतलबी व्यवहाराविषयीच्या, तस्लिमा नसरीन यांच्या, या परखड निरीक्षणावर वेगळे भाष्य करण्याची गरज नाही. याच बेगडी पुरोगामी व्यवहाराचे वर्णन ज्येष्ठ साहित्यिक आणि अभ्यासक विचारवंत प्रा. शेषराव मोरे यांनी 'पुरोगामी दहशतवाद' या शब्दात केले. अंदमान येथे भरलेल्या विश्व साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरुन बोलताना आपले हे मत मोरे यांनी अत्यंत स्पष्ट शब्दात नोंदविले आणि पुरोगामी सेक्युलर वर्तुळात खळबळ उडाली. वस्तुत: या वर्तुळात वावरणाऱ्यांवर असा आरोप काही पहिल्यांदा झालेला नाही. या आधीची किमान दोन उदाहरणे आठवतात ती त्याच वर्तुळात वावरणाऱ्या - वा निदान काही काळ वावरलेल्या मान्यवरांनीच त्यांच्या तद्दन एकांगीपणावर बोट ठेवलेल्या प्रसंगांची - पुण्याहून प्रसिद्ध होणाऱ्या 'साधना' या नियतकालिकाच्या सुवर्णमहोत्सवी वर्षाचा प्रसंग. त्या निमित्ताने

आयोजित केलेल्या समारंभात प्रमुख अतिथी या नात्याने सुविख्यात कवी आणि साधनाचेच काही काळ संपादक राहिलेले मंगेश पाडगावकर उपस्थित होते. पाडगावकरांनी या प्रसंगी केलेल्या भाषणात साधना (समाजवादी) समूहाच्या वैचारिक बंदिस्तपणावर काही टिप्पणी केली. 'आपल्या विचारांशी तंतोतंत न जुळणाऱ्या विचारांचे खुलेपणाने स्वागत आणि परिशीलन करण्यात आपण कमी पडतो आणि बहुतांश पूर्वग्रह बाळगूनच त्याकडे पाहतो' अशा अर्थाचे हितगूज पाडगावकरांनी त्या भाषणात केलेलेही समाजवादी मुखंडांना आवडले नाही. समाजवादी, पुरोगामी, सेक्युलर इ. इ. विचारांचे आवेशपूर्ण समर्थन करणारे निखिल वागळे यांनी त्यांच्या (तेव्हा चालू असलेल्या) महानगर या दैनिकाच्या अग्रलेखातून अर्वाच्च म्हणावी अशाच भाषेत पाडगावकरांसारख्या मान्यताप्राप्त कविवर्यांची 'पापडविक्या कवी' अशा शब्दात संभावना करण्यासही मागेपुढे पाहिले नाही. आम्हाला शहाणपणा शिकवणारे तुम्ही कोण? असा उद्दाम पवित्रा निखिल वागळ्यांनी त्या अग्रलेखात मोठ्या अभिमानाने धारण केला होता. तरी बरे, मंगेश पाडगावकरांनी कविमनाच्या बाण्याला शोभेल अशा सौम्य भाषेतच हितसल्ला देण्याचा प्रयत्न केला होता. पुढे पाच – सहा वर्षांनी मात्र पुरोगामी परिवाराला आणखी तीव्र शब्दांत 'घरचा आहेर' मिळाला. मिळून साऱ्या जणी या मासिकावरील पुरोगामित्वाचा शिक्का ठळक आहे हे कोणीच अमान्य करणार नाही. या मासिकाच्या तत्कालीन कार्यकारी संपादिका सुजाता देशमुख यांनी त्याच मासिकात लिहिलेल्या एका लेखाचे शीर्षकच मुळी होते 'पुरोगामी जमातवाद!' हा लेख लिहिण्यामागचे निमित्तही महत्वाचे होते. गोध्रा आणि त्यानंतर गुजरातमध्ये घडून आलेल्या दंगलींच्या विषयावरुन माजलेल्या चर्चेच्या गदारोळातच हा लेख लिहिला आणि प्रसिद्ध केला गेला होता हे विशेष. 'पुरोगामी' मंडळीकडून सातत्याने (आणि कधी कधी अकारणही) हिंदुत्ववादी वैचारिक भूमिकेचा आणि हिंदूंचा तेजोभंग करण्यात धन्यता मानली जाते, प्रसंगी टीका इतकी जहरी आणि अनाठायी केली जाते की त्यातून चीड, चिथावणी आणि उग्र प्रतिक्रिया यांनाच निमंत्रण दिले जाते' अशा आशयाचे चिंतन 'पुरोगामी जमातवाद' या मथळ्याखालील लेखात प्रकट करण्यात आले होते.

मिळून साऱ्या जणी या मासिकावरील पुरोगामित्वाचा शिक्का ठळक आहे हे कोणीच अमान्य करणार नाही. या मासिकाच्या तत्कालीन कार्यकारी संपादिका सुजाता देशमुख यांनी त्याच मासकित लिहिलेल्या एका लेखाचे शीर्षकच मुळी होते 'पुरोगामी जमातवाद!' हा लेख लिहिण्यामागचे निमित्तही महत्वाचे होते. गोध्रा आणि त्यानंतर गुजरातमध्ये घडून आलेल्या दंगलींच्या विषयावरुन माजलेल्या चर्चेच्या गदारोळातच हा लेख लिहिला आणि प्रसिद्ध केला गेला होता हे विशेष.

तिसरे ठळक उदाहरण अनुभवाला आले ते 'समरसता साहित्य संमेलन'च्या आयोजनाच्या काळात. १९९८ पासून सुरू करण्यात अलेल्या या विषयनिष्ठ साहित्य संमेलनाच्या आयोजनात, पहिली १० – १२ वर्षांपर्यंत मी स्वत: पुढकाराने सहभागी राहिलो आहे. संमेलनाच्या नियोजित विषयाच्या सर्व पैलूंची सांगोपांग चर्चा घडवून आणण्याचा प्रयत्न आम्ही मंडळी कसोशीने करीत असू. डॉ. आनंद यादव, राजा जाधव, प्रल्हाद चेंदवणकर, उत्तम बंडू तुपे, डॉ. भीमराव गस्ती अशा अनेक मान्यवर आणि समाजनिष्ठ साहित्यिकांच्या मार्गदर्शनाखाली ही संमेलने पार पडत आली आहेत. डॉ. विश्वास पाटील, डॉ. रवींद्र शोभणे, डॉ. प्रभा गणोरकर यांच्यासारख्या त्या त्या वाङमयीन विषयांच्या

*जगातील सर्व गोष्टींची निरर्थकता, त्यातील वैयर्थ्य आपल्याला जाणवतं तेव्हा आत्मशोधाची भूक आपल्यात जागी होते.*




तज्ज्ञ साहित्यिकांनी संमेलनांचे अध्यक्षपद भूषविले. डॉ. मे. पुं. रेगे, प्राचार्य डॉ. देवदत्त दाभोळकर, डॉ. शंकरराव खरात, प्राचार्य राम शेवाळकर, नामदेव ढसाळ अशा अनेक विचारवंत लेखक - समीक्षकांनी या संमेलनांमधून उद्घाटक, अतिथी, वक्ते या नात्याने उपस्थित राहून कौतुकाचे उद्गार काढले आहेत. हा सारा तपशील यासाठीच नोंदवला की 'समरसता' परिवाराकडून अत्यंत मोकळ्या, प्रामाणिक आणि वस्तुनिष्ठ विचारमंथनाचा प्रामाणिक प्रयत्न केला गेला आणि त्याला विविध विचारछटांमधील ख्यातीप्राप्त विचारवंतांनी प्रोत्साहक प्रतिसादही दिला. मात्र त्याचबरोबर असेही अनेक अनुभव आमच्या पाठीशी आहेत की 'येण्याची मनापासून इच्छा आहे, मात्र माझी ज्या (समाजवादी - पुरोगामी) वर्तुळात उठबस आहे तेथील कोंडाळ्याकडून माझ्यावर 'जाऊ नको' यासाठी प्रचंड दबाव आणला जात आहे' असे म्हणून अनेक अभ्यासक लेखक - लेखिकांनी नाईलाज आणि असमर्थता व्यक्त करीत संमेलनाला येण्याचे टाळले. (आम्हा मंडळींची, असा दबाव वैगेरे आणण्याची, प्रवृत्ती नसल्याने 'त्या' न येऊ शकलेल्या अभ्यासकांची नावनिशीवार जाहीर चर्चा आम्ही केली नाही. करणारही नाही.) मात्र बहुधा त्याच 'मिळून साऱ्या जणी' मध्ये लिहिलेल्या एका लेखात प्रा.डॉ. जयदेव डोळे यांनी 'यादव गणोरकरांसारखे पुरोगामी' लेखक समरसता साहित्य संमेलनाच्या मांडवाखाली जातात याचे वाईट वाटते...' अशा शब्दांत आपली मळमळ व्यक्त केलीच. नेमक्या याच प्रवृत्तीचे वर्णन कोणी 'पुरोगामी जमातवाद' या शब्दात केले, तर आता डॉ. शेषराव मोरे यांनी त्याला 'दहशतवाद' संबोधले. असा वैचारिक दहशतवाद तर पुरोगामी म्हणविणाऱ्यांनी कसोशीने जपलाच, पण व्यावहारिक पातळीवरील अगदी घृणास्पद हिंसेचा अवलंब करणाऱ्या दहशतवादाची तळी उचलण्याचे पापही त्यांनी बिनदिक्कतपणे केले आहे.

जम्मू - काश्मिरच्या भूभागात, पूर्वांचलच्या क्षेत्रात आणि छत्तीसगड - झारखंड परिसरात दहशतवादी हिंसाचाराचे थैमान घातले गेल्याच्या असंख्य घटना स्वातंत्र्यानंतरच्या गेल्या ६० - ६५ वर्षांत घडल्या आहेत. त्रिपुरामधील रिआंग या सूर्यपूजक जनजातीच्या बांधवांनी धर्मांतर करुन ख्रिस्ती होण्यास नकार दिला तेव्हा (१९९० च्या दशकात) रिआंग बांधवांच्या शंभराहून अधिक वस्त्या जाळल्या गेल्या, अनेक बांधव त्यात बळी पडले, तर एक लाखाहून अधिक रिआंग बांधव आपापल्या परंपरागत वसाहतींमधून विस्थापित



*वासनेचं उदात्तीकरण हाच, उपभोग आणि वासना यांच्या दुष्टचक्रातून सुटण्याचा एकमेव उपाय आहे.*

झाले. सिल्चरजवळच्या जंगलात उभ्या करण्यात आलेल्या निर्वासित छावण्यांमध्ये अजूनही असे रिआंग बांधव हजारोंच्या संख्येने हलाखीचे जिणे जगत आहेत. पुरोगामी मुखंडांनी त्यांच्यासाठी आवाज उठविल्याचे ऐकिवात नाही. बस्तर-दंतेवाडा-जगदलपूर परिसरात नक्षली कारवायांना बळी पडलेल्या निरपराध जनजाती बांधवांची संख्याही हजारांच्या परिभाषेत पोचली आहे. भूसुरूंगानी गाड्या उडवून, पोलिस स्थानके, तुरूंग इ. वर सशस्त्र हल्ला चढवून सुरक्षा दलाच्या जवानांना सामूहिक कंठस्नान घालण्याच्या अनेक कारवाया माओवाद्यांनी घडवून आणल्या आहेत. या कारवायांचे संचालन घनदाट जंगलात लपून राहणारे म्होरके करतात, पण प्रत्यक्ष कारवाईच्या आघाडीवर मात्र आदिवासी तरुणांना पाठवून दिले जाते. त्यामुळे प्रस्थापितांच्या शोषणाला बळी पडणारा वर्गच 'शोषणाविरुद्धच्या संघर्षाच्या' नावाखाली पोलिसी प्रतिकारालाही समोरा जातो आणि बळी पडतो. माओवाद्यांच्या या कुटील आणि क्रूर कृत्यांचा निषेध करणे तर दूरच, उलट वृत्तपत्रीय प्रचारात मोठमोठे लेख लिहून, माओवादाचे समर्थन करून त्यांच्या हिंसाचाराला 'तात्त्विक आधार' प्राप्त करून देण्याचा अघोरीपणाही पुरोगामीत्वाचे लेबल कपाळावर चिकटवलेले अरुंधती रॉयसारखे मुखंडच करीत आले आहेत. केरळ आणि आंध्रच्या भागातही साम्यवादी आणि माओवादी प्रवृत्तीच्या तांड्यांनी रा. स्व. संघ आणि अभाविपच्या कार्यकर्त्यांवर क्रूर हल्ले करून त्यांच्या हत्या केल्याच्या अनेक घटना घडल्या आहेत. माजी पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्या हत्येनंतर घडवून आणण्यात आलेल्या हिंसाचारात तीन हजारहून अधिक शीख बांधवांचे शिरकाण करण्यात आले. यातल्या आणि अशा कोणत्याही घटनेनंतर, हत्याकांडानंतर वा जळीतकांडानंतर (पुरस्कार परत करणे तर सोडाच) निषेधाचे, अगदी खोटे अश्रू ढाळतानाही कोणी पुरोगामी कधी दिसला नाही. नक्षलवादी अत्याचारांच्या विरोधात छत्तीसगडमधील आदिवासी बांधव एकवटून उभा राहिला. तेथील काँग्रेसनेते महेंद्र कर्मा (विधानसभेत विरोधी पक्षनेतेपदही या कर्मांनी भूषविले होते.) यांच्या नेतृत्त्वाखाली सलवाजुडूम ही शांततापूर्ण विरोधाची चळवळ उभी केली. गावागावात घुसून तेथील लोकांवर सर्व प्रकारची जबरदस्ती करणाऱ्या माओवादी गुंडांना प्रतिकार करण्याची हिंमत या चळवळीने आदिवासी बांधवांमध्ये निर्माण केली. माओवाद्यांना संघटीतपणे शह दिला जाऊ लागला. तेव्हाही पुरोगामी प्रसारमाध्यमे आणि नेत्यांनी या चळवळीला बदनाम करण्याच्या प्रयत्नात कसूर केली नाही. ओरिसाच्या आदिवासी क्षेत्रात ख्रिस्ती धर्मांतराला विरोध करून आदिवासींवरील मिशनरी दडपशाहीच्या विरूद्ध संघटीत प्रयत्न करमारे स्वामी लक्ष्मणानंद यांची हत्या झाली. तेव्हाही त्या हत्येविरूद्ध पुरोगामीत्त्वाची पताका फडकवणाऱ्यांकडून निषेधाचा उद्गार निघाला नाही. त्या उलट ख्रिश्चन मिशन्स, चर्चेस आणि नन्सवरील अत्याचाराच्या खोट्या-नाट्या कंड्या पिकवून हिंदुत्त्ववाद्यांवर टीकेची धार धरण्यात आल्याची अनेक उदाहरणे तपासातून समोर आली.

जम्मू काश्मीरमधील दहशतवादावर कडक नियंत्रण आणण्याच्या कामी प्रभावी भूमिका बजावणाऱ्या लष्कराला आणि सुरक्षा यंत्रणांनाही या सेक्युलॅरिस्ट पुरोगाम्यांनी सोडले नाही. दहशतवाद, घुसखोरी, हत्याकांडे यासारख्या शेजारी शत्रुराष्ट्राच्या सक्रीय सहाय्याने चालविण्यात येणाऱ्या कारवायांची आणि त्यांना स्थानिक समर्थन मिळवून देणाऱ्या घरभेद्यांची कोंडी व्हायला प्रारंभ झाला तेव्हा लष्कर विशेषाधिकार कायद्याविरूद्ध मोहीम उभारण्यात समस्त पुरोगामी सरसावले. तेथेही लष्करी जवान अतिरेक, अत्याचार करीत असलेल्या धादान्त खोट्या आरोपांचे रान उठविण्याचा प्रयत्न करण्यात आला.

कर्नाटकाच्या क्षेत्रात देवदासी प्रथा उच्चाटनाचे, देवदासी भगिनींच्या पुनर्वसनाचे आणि बेरड-रामोशी समाजाबांधवांच्या उन्नतीचे अत्यंत महत्त्वपूर्ण कार्य गेली अनेक वर्षे निरलसपणे चालविणारे डॉ. भीमरत्न गस्ती

*आयुष्य हे कबड्डीच्या खेळासारखे आहे. जोवर दम टिकून आहे तोवरच आपले कौशल्य पणाला लावून गडी बाद करता येतो.*

यांचाही अनुभव असाच आहे. डॉ. गस्तींच्या कार्याचा मुक्तकंठाने गौरव करण्यासाठी तत्कालीन सरसंघचालक रज्जूभैय्या यांनी त्यांच्या प्रकल्पाला भेट दिली. भीमराव गस्ती यांनीही अत्यंत प्रामाणिक भावनेने संघपरिवाराशी नाते जोडले आणि तोपर्यंत त्यांचा उदोउदो करणाऱ्या समाजवादी कंपूचे माथे भडकले. त्यांनी भीमरावांविरूद्ध चाली रचल्या. भीमरावांच्या पत्नीला, कुटुंबीयांना त्यांच्याविरूद्ध भडकावण्याचे निंदनीय प्रयत्न केले गेले. त्यांच्या प्रकल्पावरील गायरान पेटवून देण्यात आले.

पुरोगामी, सेक्युलॅरिस्टांच्या वैचारिक दांभिकतेची आणि वैचारिक दहशतवादाची अशी किती उदाहरणे सांगावीत! यातल्या प्रत्येक वेळी कालांतराने त्यांचे पितळ उघडे पडत गेले. गुजरात दंगलीवरून अपप्रचाराची आणि कोर्टबाजीची धमाल उडविणाऱ्या तिस्ता सेटलवाड यांच्यावर सध्या अक्षरशः तोंड लपवित फिरण्याची पाळी आली आहे. जहिरा शेख यांच्यावर कोर्टात खोटे प्रतिज्ञापत्र सादर करण्याचा दबाव तिस्तांनी कसा आणला याची सुरस कहाणी त्यांचेच एकेकाळचे सहकारी रफिक यांनी न्यायालयालाच ऐकविली. सर्व लोकांना सर्व काळ मूर्ख बनवता येत नाही या सत्याचा जळजळीत अनुभव आता पुरोगामी कंपूला येऊ लागला आहे. तशातच राजकीय पातळीवर नरेंद्र मोदींना घवघवीत यश मिळाले आणि देशातच नव्हे तर जगात त्यांच्या सात्विक, समर्थ आणि स्वाभिमानी नेतृत्त्वाची मुक्तकंठाने प्रशंसा होऊ लागली. त्यामुळे सेक्युलर पुरोगाम्यांच्या वैफल्याला पारावार राहिला नाही. त्यांचा जळफळाट आता पुरस्कार वापसीसारख्या वांझोट्या कांगावखोरीतून व्यक्त होऊ लागला आहे. प्रा. शेषराव मोरे यांनी घेतलेल्या पुरोगामी दहशतवादाच्या समाचाराचा आणि त्यावर भडकून उठून हात चोळणाऱ्या पुरोगामी कांगाव्याचा अन्वयार्थ हा आहे.

***

A TALE OF TWO KILLINGS

# उदार हिंदूंसमोरील 'सेक्युलर' आव्हान...




**तरुण विजय**

*ज्येष्ठ पत्रकार व राज्यसभा सदस्य नवी दिल्ली.*


देश सध्या एका विशिष्ट ध्येयाने प्रेरित होऊन वाटचाल करीत असतानाच, विकासाच्या नावाखाली देशाच्या विविध क्षेत्रात भांडवलदारांच्या गुंतवणुकीचा आरोप काही मंडळींकडून गेल्या काही दिवसापर्यंत करण्यात येत होता. मात्र आता तो मुद्दा सोडून देशातील हिंदू लोक हे किती क्रूर आहेत आणि ते लोकशाहीची मूल्ये पायदळी तुडवून लोकांच्या आहार स्वातंत्र्यावर कशी गदा आणतायत याकडे लक्ष वळविण्याचा त्यांचा जोरदार प्रयत्न सुरू आहे. दादरी कांड, पाकिस्तानी कलाकार गुलाम अली यांच्या गाण्याचा कार्यक्रम उधळणे आणि पाकिस्तानचे माजी परराष्ट्रमंत्री कसुरी यांच्या पुस्तक प्रकाशन सोहळ्याला झालेला विरोध तसेच कलबुर्गी, कॉ. पानसरे यांसारख्या लेखकांच्या झालेल्या हत्या या त्या घटना. यात वृत्तपत्रे, वृत्तवाहिन्या तसेच समाजमाध्यमांतील काही मंडळींकडून असे सिद्ध करण्याचा प्रयत्न सुरू आहे की, देशात जणु याशिवाय दुसरे काही घडतच नाही. त्यातील

**खाण्या-पिण्याबाबतीत टोकाचे मतभेद असू शकतात मात्र त्यामुळे सामाजिक वातावरणात तणाव निर्माण होऊ न देणे याची जबाबदारी सर्वांची आणि समान असायला हवी. दुर्दैवाने देशातील एक विशिष्ट वर्ग आहे की जो स्वतःला सेक्युलर अर्थात धर्मनिरपेक्ष म्हणवतोय. विशेषतः जो इंग्रजी माध्यमात झळकत आहे. ज्यांचा असा भ्रम झालाय की, हिंदुंच्या भावना दुखावणे म्हणजेच सेक्युलॅरिझम वा धर्मनिरपेक्षतावादी असल्याचे प्रतिक आहे.**

विरोधाभास असा की, या घटना ज्या राज्यात घडल्या त्यात तेथील राज्य सरकारांचा काहीच संबंध नाही. काही जबाबदारी नाही. जे काही आहे ते केवळ आणि केवळ दिल्लीतील मोदी सरकारचीच जबाबदारी आहे.

ही एक विचित्र स्थिती आहे. जर एखादा हिंदू अशा घटनांचे समर्थन करत असेल किंवा सार्वजनिक क्षेत्रात निषिद्ध मानलेल्या गोष्टींचा आधार घेत असेल तर तो आपला हिंदू असल्याचा अधिकार गमावतो. हिंदू असण्याचा अर्थच असा की, अभिव्यक्ती आणि विचार स्वातंत्र्यावर विश्वास असणे. दादरी हत्याकांड प्रकरणी मी म्हणालो होतो की, अखलाकच्या मुलीचे दुःख हे मला माझ्या स्वतःच्या मुलीच्या दुःखासमान वाटते. कोणालाही कोणत्याही परिस्थितीत कायदा हातात घेण्याची मोकळीक देताच येत नाही. कोणत्याही परिस्थितीत देशातील संविधानाने कायद्याचे साधन आपल्या हाती दिले आहे. असं सर्व असतानाही उत्तर प्रदेशमधील अखलाक हत्याकांडाला राज्य शासनाला जबाबदार न धरता केवळ आणि केवळ केंद्रातील मोदी सरकार आणि काही हिंदुत्ववादी संघटनांनाच यात जबाबदार धरण्यात येत आहे. ज्यांचा वास्तवात त्याच्याशी काडीचाही संबंध नाही. गुलाम अली तसेच कसुरी यांच्या कार्यक्रमांना महाराष्ट्रातील भाजप शासित फडणवीस सरकारनेच परवानगी दिली होती. संगीत हे सार्वभौम आहे. भारत अशा कोणत्याच गोष्टीच्या विरोधात नाही जिथे संगीत कलेला आक्रमण झेलावे लागेल. पाकिस्तानात असे होते. मात्र पाकिस्तान आपला आदर्श होऊ शकत नाही. तसेच पाकिस्तानच्या प्रतिक्रियेमुळे आपण आपला मूळ स्वभाव बदलण्यास बांधील असण्याचे काहीच कारण नाही. पाकिस्तानच्या दहशतवादाला आणि त्याने लादलेल्या युद्धाला आपण चोख प्रत्युत्तर देत आलोय आणि यापुढेही देतच राहू. कदाचित यापुढे आपल्या हल्ल्याने पाकिस्तान राहील की नाही सांगता येत नाही. मात्र असं असलं तरी त्यांच्या कृत्यांचा राग संगीत कलेवर काढणे कितपत योग्य आहे? हीच गोष्ट कसुरी यांच्या पुस्तकाबाबतही लागू पडते. एखाद्याशी आपण कदाचित सहमत नसलो, जो आपल्या विचारधारेचा किंवा आपल्या तत्त्वांचा कट्टर विरोधक असला तरी त्यालाही आपली गोष्ट मांडण्याचा अधिकार मिळतो तो केवळ भारत देशातच. हीच ती गोष्ट आहे जी भारताला एक वेगळेपण प्राप्त करून देते.

भारतातील हिंदू जगभरात भटकंती करतात. ते अशा हॉटेलमध्येही जातात जिथे गोमांस बनते. परंतु ते आपल्या आवडीचे शाकाहारी किंवा अन्य खाद्यपदार्थ खातात. स्वामी विवेकानंदांनी आपल्या, पूर्व आणि पश्चिम या

पुस्तकात हिंदुंच्या खान-पानबाबतच्या आग्रहावर कठोर प्रहार केले आहेत. अनेक लोकांना हे ऐकून धक्का बसेल की, रामकृष्ण मिशनचा मुख्य मठ असलेल्या बेलूर मठात हिंदू बंगाली लोकांत सर्वसाधारणपणे प्रचलित असलेला मांसाहार वर्षातून एकदा बनविला जातो. भारतातील संत आणि भिक्षू धर्म प्रचारक जगभर गेले, त्यांनी जर का खाण्या-पिण्याबाबतचे कठोर पालन केले असते तर चीन, जपान, कोरियासारख्या देशात बौद्ध तत्त्वज्ञान किंवा हिंदू सनातन विचारांचा प्रसार झाला असता काय? सामिष आणि निरामिष यांचे द्वंद्व खूप जुने आहे. शाकाहाराचे महत्त्व निश्चितच वाढत आहे, मात्र खाणे-पिणे हे नेहमीच व्यक्तिगत किंवा आवडी-निवडीचा विषय असायला हवा.

खाण्या-पिण्याबाबतीत टोकाचे मतभेद असू शकतात मात्र त्यामुळे सामाजिक वातावरणात तणाव निर्माण होऊ न देणे याची जबाबदारी सर्वांची आणि समान असायला हवी. दुर्दैवाने देशातील एक विशिष्ट वर्ग आहे की जो स्वतःला सेक्युलर अर्थात धर्मनिरपेक्ष म्हणवतोय. विशेषतः जो इंग्रजी माध्यमात झळकत आहे. ज्यांचा असा भ्रम झालाय की, हिंदुंच्या भावना दुखावणे म्हणजेच सेक्युलॅरिझम वा धर्मनिरपेक्षतावादी असल्याचे प्रतिक आहे. त्यातील लेखक आणि स्तंभलेखकांनी माध्यमात असे वातावरण तयार केले आहे की, देशात मोठ्या प्रमाणात गोमांस खाणारे लोक आहेत आणि या मोदी सरकारमुळेच धर्माबद्दल आस्था असणारे लोक या गोमांस खाणाऱ्या लोकांवर अन्याय करत आहेत. एका इंग्रजी स्तंभलेखकाने लिहिले की, त्याला गोमांस खूप प्रिय आहे. काश्मीरमध्ये हिंदुंना खिजवण्यासाठी भर बाजारात असभ्यता आणि पाशवीपणाचे दर्शन घडवत गाय कापण्यात आली. ज्या देशात कृष्णाला गोपाल म्हणून पूजले जाते. ज्या देशात असे कोट्यवधी हिंदू राहतात जे गाईला आपल्या मातेसमान मानतात. ते आपल्या समक्ष गोमातेचा अपमान होताना किंवा तिला कापताना आपल्या आईवर आक्रमण होत असल्यासारखे मानतात. परदेशात तर परदेशी सरकार आहे. मात्र खूप वर्षांनंतर आपल्याला स्वातंत्र्य मिळाले आहे तर मग, आपल्या देशात हिंदू आपल्या सन्मानाची अपेक्षा करू शकत नाही? जर गोमांस खाणाऱ्यांना वाटत असेल की, त्यांच्या भावनांचा सन्मान व्हायला हवा तर मग त्यांनीही हिंदुंच्या भावनांचा सन्मान करायला नको? इस्लाममध्ये कुठेही गोमांस अनिवार्य असल्याचे सांगितले गेले नाही. केवळ हिंदुंवर आघात करण्यासाठी हिंदुंपासून मुस्लिम बनलेल्या समाजात गोमांस अनिवार्य करण्याचा अट्टाहास का करण्यात येतो? यावर मंथन होण्याची गरज नाही?

सध्या काही लेखकांकडून साहित्य आकादमीचे पुरस्कार परत केले जात आहेत. कारण काय तर मोदी सत्तेत आल्यापासून देशात असहिष्णुता वाढली आहे, असा त्यांचा आक्षेप आहे. मग जेव्हा १९८४ साली देशात शीख दंगल झाली त्यावेळी जी परिस्थिती होती ती कशी होती? त्याबद्दल ही मंडळी काही बोलणार आहे का? त्याचे उत्तर ही मंडळी देणार आहे का? ज्यावेळी काश्मीरमधून पाच लाख हिंदूंना अपमानित करून, त्यांच्या महिलांचा छळ करून त्यांना काश्मीरमधून बाहेर पडण्यास भाग पाडण्यात आले त्यावेळी पुरस्कार परत करणारी मंडळी कुठे गेली होती? त्यावेळी हे लोक शांत का बसले? देशाचे जवान, प्राध्यापक तसेच शेतकरी जेव्हा नक्षलवाद्यांकडून मारले जातात तेव्हादेखील ही मंडळी बोटचेपी भूमिका घेऊन शांत का बसतात? त्यावेळी देशात आराजकता माजलेली नसते काय? त्यामुळे पुरस्कार परत करणे हे घाणेरडे राजकारण आहे बाकी काही नाही.

कॉ. पानसरे किंवा कलबुर्गी यांसारख्या लेखकांच्या हत्येचे कोणीही समर्थन करत नाही. मात्र लोकांना हे माहिती नाही की, कलबुर्गी यांनी आपल्या दृष्टीने अंधश्रद्धेवर प्रहार करताना म्हंटले होते की, अनंतमूर्ती यांनी एकदा शिवलिंगावर मूत्र विसर्जन केले होते, मात्र तरीही त्यांचे काहीच वाईट झाले नाही. त्यांच्या या वक्तव्याचा निषेधही करण्यात आला होता. मात्र तरीही

याचा निषेध करण्यासाठी केवळ कायद्याचा आधार घेणेच क्रमप्राप्त ठरते. दुर्दैवाने स्वतःला सेक्युलर म्हणवणाऱ्या मंडळींनी गेल्या सहा दशकापासून प्रत्येक बौध्दिक संस्थेत, माध्यमातील स्तंभलेखात, तसेच शासकीय शिक्षण संस्थांमध्ये स्टॅलीनच्या मानसिकतेचे दर्शन घडवत राष्ट्रीय विचारधारेशी जोडले गेलेल्या लोकांना अस्पृश्यच ठेवले. सेक्युलर किंवा पुरोगामी असण्याचा अर्थच हिंदू विरोधी किंवा मुस्लिमांचे लांगुलचालन करणे असाच बनवून ठेवला. आम्ही जेव्हा विकासाची भाषा बोलतो तेव्हा ते विनाश असे वाचतात. त्यांच्यासाठी परदेशी डॉलरच्या माध्यमातून हिंदुंचे ख्रिश्चनीकरण म्हणजे उच्चतम दर्जाचे शिक्षण आणि धार्मिक स्वांतत्र्याची कसोटी होय. मात्र जर का ख्रिश्चन धर्म सोडून हिंदू धर्मात प्रवेश केला तर मात्र तो देशाच्या धार्मिक एकतेला धोका निर्माण होतो आणि दंगल भडकते. हा सेक्युलर किंवा पुरोगामी पाखंडीपणा हिंदुंमध्ये आक्रोश तर निर्माण करतोच. याशिवाय आपण एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, मोदी सरकारला मिळालेल्या असाधारण आणि अभूतपूर्व बहुमतामुळे खवळलेल्या वर्गाकडून सातत्याने प्रयत्न केला जाणार की, समाजातील संवाद हा विकासाऐवजी त्या मुद्यावर व्हावा ज्यामुळे धार्मिक एकतेचे रूपांतर वैमनस्यात रूपांतरीत होईल. तसेच सामाजिक वातावरण इतके गढूळ व्हावे की जेणेकरून मोदी सरकारवर प्रहार करता येईल. त्यामुळे प्रश्न हा आहे की, आपल्याला जाणीवपूर्वक खिजवण्याच्या त्यांच्या अशा प्रयत्नांना बळकटी द्यायची? तथाकथित सेक्युलर मंडळींच्या मनसुब्यांना यश मिळवून देत औद्योगिकतेच्या, विकासाच्या अपूर्व संधीकाळात आपल्यामागे सेक्युलर ग्रहण लाऊन देण्याची संधी त्यांना द्यायची का?

***

## अल्प परिचय

*प्रा. डॉ. शेषराव मोरे (जन्म : १७ ऑगस्ट, १९४७) हे ललित लिखाण टाळून वैचारिक लिखाणाचा प्रवाह समृद्ध करणारे एक मराठी लेखक आहेत. संभाजीनगरच्या सरकारी अभियांत्रिकी महाविद्यालयात ते प्राध्यापक होते. ते कायद्याचे पदवीधरही आहेत. २०१५ मध्ये अंदमान येथे झालेल्या विश्‍व मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषवले आहे.*

**शेषराव मोरे यांनी लिहिलेली पुस्तके –** *१८५७ चा जिहाद, अप्रिय पण, काँग्रेसने आणि गांधीजींनी अखंड भारत का नाकारला, काश्मीर एक शापित नंदनवन, प्रेषितानंतरचे पहिले चार आदर्श खलिफा, मुस्लिम मनाचा शोध, विचारकलह, (सावरकरांसंबंधी) सत्य आणि विपर्यास, सावरकरांचा बुद्धिवाद आणि हिंदुत्ववाद, सावरकरांचे समाजकारण, सावरकरांच्या समाजक्रांतीचे अंतरंग.*

**प्रा. शेषराव मोरे यांची विशेष मुलाखत**

# भीतीखाली वावरत आहे, आजची मराठी वैचारिकता...

**प्रश्न – १) पुरोगामी दहशतवाद हा शब्द प्रयोग आपल्याला का करावासा वाटला? यामागचे आपले नक्की काय चिंतन आहे?**

**उत्तर –** पुरोगामी दहशतवाद हा शब्दप्रयोग एका विशिष्ट संदर्भात माझ्या अंदमान येथील भाषणात आला आहे व तो केवळ माझ्यावरील टीकेसंबंधात आलेला आहे. यासंबंधातील माझ्या भाषणातील संबंधित भागच मी येथे उद्धृत करतो. – या संमेलनाच्या अध्यक्षाची निवड घोषित होण्याच्या एक दिवस आधी एका प्रमुख मराठी दैनिकात आलेल्या बातमीत म्हटले होते की, सावरकरांच्या नावे अंदमानला भरणाऱ्या विश्व मराठी साहित्य संमेलनाला अध्यक्ष म्हणून पुरोगामी विचारधारेतील व्यक्ती मिळत नसल्याने हिंदुत्ववादी विचारांच्या व्यक्तीची नावे समोर आली आहेत. त्यांनी या चार-पाच नावातील पहिल्या क्रमांकावर माझे नाव लिहिले होते. अर्थात त्या बातमीदाराची काही चूक नव्हती. आज महाराष्ट्रात जी वैचारिकता चालू आहे, तिचेच प्रतिबिंब त्या बातमीत पडले

होते. हा पुरोगामी आणि तो प्रतिगामी, हा डावा आणि तो उजवा अशी शिक्के मारून वर्गवारी करण्याची पद्धत महाराष्ट्रात प्रचलित करण्यात आली आहे. ती कोणी प्रचलित केली? अर्थात पुरोगाम्यांनी ! हे ठरविण्याची त्यांची कसोटी कोणती? त्यांचे आर्थिक विचार कोणते आहेत? समाजवादी की भांडवलवादी? धार्मिक विचार कोणते आहेत ? तो बुद्धिवादी की परंपरावादी ? सेक्युलर आहे की धर्मवादी? लोकशाहीवादी आहे की नाही ? - अशा कोणत्या कसोट्यांच्या आधारे ते ठरविले जाते काय? नाही ! नाही ! नाही ! तर ते ठरविले जाते ते एकाच महाकसोटीच्या आधारे - ती कसोटी म्हणजे तो हिंदुत्ववादी आहे की नाही ?

बरे हिंदुत्ववादी म्हणजे काय ? त्याचीही कसोटी तेच ठरविणार. हिंदू या शब्दाचा अभिमान धरणारा एवढेच नाही तर हिंदू या शब्दाचा निंदाव्यंजक वा निषेधार्ह या अर्थाने नव्हे तर चांगल्या वा त्याची ओळख पटेल या अर्थाने उपयोग करणारा प्रत्येकजण त्यांच्या मते हिंदुत्ववादी. त्यामुळे हिंदू शब्दाचा वापर करून आपण प्रतिगामी वा जातीयवादी ठरणार नाही ना ? या भितीखाली आजची मराठी वैचारिकता वावरत आहे. त्यामुळे हिंदुंच्या विरोधी जेवढे अधिक बोलू तेवढे आपण अधिक पुरोगामी ठरू असे समीकरण व पुरोगामीत्वाची व्याख्या तयार झाली आहे. हा एक प्रकारचा पुरोगामी दहशतवाद असून त्याने मराठी वैचारिकतेला घट्ट विळखा घातला आहे. जर कोणी खरेखुरे पुरोगामी या संमेलनाचे अध्यक्ष होण्यास तयार नसतील तर ते या पुरोगामी दहशतवादामुळेच होय.

यात माझे काय चुकले ? ही आजची वास्तविकता नाही काय, त्यामुळेच मला त्या बातमीदाराने प्रतिगामी अर्थाने हिंदुत्ववादी म्हटले नाही काय ? प्रतिगामी असतो तो वाईट, मागासलेला, जुनाट विचारांचा, सनातनी, बुरसटलेल्या विचारांचा, समाजसुधारणाविरोधी, परंपरावादी, धर्मवादी, निंदनीय - असे मानून एखाद्याला प्रतिगामी मानले जाते. वैचारिक क्षेत्रातील सर्वात वाईट शिवी कोणती असेल तर ती प्रतिगामी होय. या वाईटतम अर्थाने मला प्रतिगामी म्हटलेले मी कसा काय सहन करेन. त्या संमेलनाच्या अध्यक्षपदासंबंधात हा माझ्यावर नीचतम आरोप केला गेला म्हणून त्याच्या उत्तरासंबंधात अध्यक्षीय भाषणात एक प्रकारचा पुरोगामी दहशतवाद असा शब्दप्रयोग केला आहे. तथाकथित पुरोगाम्यांवर वाट वाकडी करून टीका करण्यासाठी हे बोललो नाही. मी या ठिकाणी योजलेला एक प्रकारचा फार महत्वाचा आहे. हे उघडच आहे की मी येथे वैचारिक दहशतवादासंबंधात बोललो आहे, शारीरिक दहशतवादासंबंधात नाही. हिंदू शब्दाचा वापर केला तर मला पुरोगामी विचारवंत प्रतिगामी म्हणतील. म्हणून माझ्या व माझ्यासारख्या इतर प्रतिगामी' नसणाऱ्या लोकांच्या मनात भीती निर्माण करण्याचा हा प्रकार नव्हे काय ? या अर्थाने हा एक प्रकारचा दहशतवाद ठरत नाही का ? तो पुरोगामी निर्माण करीत आहेत, म्हणून त्यास मी पुरोगामी म्हटले. यात माझे काय चुकले. वैचारिक दहशतवादी' यापेक्षाही प्रतिगामी' हा वाईट व मानहानीकारक आरोप आहे, असे मी मानतो.

याचसंदर्भात मी भाषणात त्यांना प्रश्न विचारला आहे की, मी हो प्रतिगामी कसा ? कशाच्या आधारे हे ठरवलेत ? तर मी सावरकरांवर ग्रंथ लिहिले व त्यांचे विचार समाजाला समजून सांगितले म्हणून ... सावरकर प्रतिगामी म्हणून मी प्रतिगामी ! आता सावरकर प्रतिगामी कसे ? तर ते हिंदुत्ववादी होते म्हणून ! पण ते हिंदुत्ववादी होते म्हणजे नक्की काय होते?'' त्यानंतर मी भाषणात सावरकर हिंदुत्ववादी होते म्हणजे काय होते ? हे दाखवून दिले आहे. तेव्हा माझा मुद्दा असा होता की, सावरकर किंवा मी पुरोगामीच असताना त्यांना किंवा मला तुम्ही प्रतिगामी का म्हणालात ते सांगा ?

**प्रश्न २) आपल्या लेखी मूळ पुरोगामी संकल्पना नक्की कशी आहे? मात्र आजच्या स्थितीत ती कशी दर्शविली जाते?**

**उत्तर -** माझ्यालेखी पुरोगामी संकल्पना काय आहे, यास काय महत्त्व आहे? कारण ते ठरवण्याचा अधिकार



पुरोगाम्यांनी स्वत:कडे घेतला आहे. या संकल्पनेचा खरा अर्थ घ्यायचा तर पुरोगामी म्हणजे विचाराने आधुनिक असणारी, काळाबरोबर जाणारी, काहीप्रकरणी काळाच्या पुढे असलेली व्यक्ती असा घ्यायला हवा. मुळात या संकल्पनेचा संदर्भ प्राचीन, मध्ययुगीन काळात उदय पावलेल्या धर्माशी आणि धर्मपरंपरांशी जखडून घेण्याशी व त्या धर्म शिकवणीनुसार आजही वागण्याशी आहे. याच्या अर्थानुसार प्रतिगामी म्हणजे धर्मपरंपरावादी व पुरोगामी म्हणजे धर्मपरंपरा प्रमाण न मानता आजच्या काळाच्या अनुरूप, योग्य, उपयुक्त वा समाजासाठी हितकारक असणाऱ्या विचारांचा वा सुधारणांचा स्वीकार व पुरस्कार करणारा असे म्हटले पाहिजे. याच अर्थानुसार लोकशाही, सर्व माणसे समान, स्त्री-पुरूष समानता, सामाजिक व आर्थिक समता, स्वातंत्र्य, समता व बंधुता ही त्रिमूल्ये, विज्ञाननिष्ठा, बुद्धीवाद व सामाजिक न्याय, सेक्युलॅरिझम इत्यादी मूल्ये मानतो, तो पुरोगामी ठरतो. परंपरावादी हा धर्माने सांगितलेली मूल्ये प्रमाण मानतो. पुरोगामी हा वरील प्रमाण मूल्ये प्रमाण मानतो व हीसुद्धा मूल्ये काळानुसार बदलत जातील, असे मानतो. ही मूल्ये ठरवण्याचा समाजाचा अधिकार तो मान्य करतो. सामान्यत: अशा प्रकारे पुरोगामीपणा व प्रतिगामीपणा म्हणजे काय ? हे सांगता येते. यातील फरक मुख्यत: धर्मप्रामाण्य व धर्मग्रंथप्रामाण्य मानण्या, न मानण्याशी आहे.

या अर्थानुसार सावरकर आणि मीही १०० टक्के पुरोगामीच आहोत. व तेच मी भाषणात मांडले आहे. जगातील सर्वच धर्मग्रंथ हे आता कालबाह्य झाले आहेत. धर्मग्रंथाचे स्थान ग्रंथालयाच्या कपाटात आहे. व्यवहारात नव्हे. ही सावरकरांची खणखणीत भूमिका आहे. धर्मग्रंथावर समाजसंस्था उभा करण्याचे दिवस गेले. ही त्यांची घोषणा होती. आज आपण समाजाची व राष्ट्राची उभारणी बुद्धिवादावर केली पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता. चांगली गोष्ट धर्मग्रंथात आहे, असे म्हणूसुद्धा नये, असा त्यांचा कटाक्ष होता. धर्मग्रंथात सुधारणा होत नसते, नवा धर्मग्रंथ तयार करता येत नसतो. कारण ते काम परमेश्वराचे असते. त्यामुळे धर्मग्रंथ हा पूर्णपणे टाकूनच द्यावा लागतो, अशी त्यांची शिकवण होती. त्यांचे हे विचार मला मान्य आहेत, त्यामुळे या अर्थाने कोणत्याही पुरोगाम्याइतकाच मी पुरोगामी आहे, असे माझे म्हणणे आहे.

मात्र आजचे पुरोगामी या अर्थाच्या जोडीला आणखी गोष्टी आणत असतात. हिंदू समाज व मुस्लिम समाज यांच्या संबंधात एखाद्याची मते काय आहेत, यास ही पुरोगामी मंडळी पुरोगामीत्वाचा भाग करतात. हिंदू धर्माची कठोर चिकित्सा करणे, हा निश्चितच पुरोगामीत्वाचा अविभाज्य भाग आहे आणि पुरोगामी

*ध्येय निश्चित असेल तरच जीवनप्रवास योग्य तऱ्हेने होतो अन्यथा ती एक निरर्थक, निरुपयोगी आणि निरुद्देश वणवण ठरते !*

या अर्थाने निश्चितच पुरोगामी आहेत, यात शंका नाही. आणि याबद्दल पुरोगाम्यांविषयी मला अभिमान आहे. यासाठी ते मला स्वागतार्ह वाटतात. परंतु हेच पुरोगामी इस्लाम धर्मासंबंधात वेगळी भूमिका घेतात. इस्लामची चिकित्सा करण्याची त्यांची तयारी नसते. ते वेद, मनुस्मृती इत्यादी धर्मग्रंथ कालबाह्य झाले आहे असे म्हणतील पण इस्लामच्या कुराण, हदिस, शरीयत आदी धर्मग्रंथासंबंधात ते मौन पाळतील. त्यांचा पुरोगामीपणा धर्मनि:पक्षपातीपणा नाही. धर्मानुसार तो बदलत असतो. दुसऱ्या भाषेत सांगायचे तर ते अर्धवट पुरोगामी आहेत. जोपर्यंत जे हिंदू धर्माप्रमाणेच अन्य धर्मांचीही तशीच बुद्धिवादी चिकित्सा करण्यास तयार होत नाहीत. तोवर ते पूर्ण पुरोगामी झाले आहेत, असे म्हणताच येणार नाही. तेव्हा आजच्या काळासंदर्भात व वरील अर्थाने पुरोगामी व प्रतिगामी यांचा अर्थ असा सांगता येईल – जो स्वत:च्या वा कोणत्याही धर्माची चिकित्सा करीत नाही व म्हणून धर्म परंपरावादी आहे तो प्रतिगामी आहे, आणि जो फक्त हिंदू धर्माची चिकित्सा करतो पण इतर धर्माची चिकित्सा करत नाही, तो पुरोगामी' !

**प्रश्न ३) आजच्या पुरोगामी संकल्पनेत कोणते बदल अपेक्षित आहेत ?**

**उत्तर –** आजच्या पुरोगामी संकल्पनेत कोणते बदल अपेक्षित आहेत, यापेक्षा आजच्या पुरोगाम्यांनी त्यांच्या संकल्पनेत कोणते बदल केले पाहिजेत, असा प्रश्न विचारणे अधिक युक्त झाले असते. त्यांनी हिंदू धर्माप्रमाणेच इस्लामचीही चिकित्सा आपल्या पुरोगाम ीत्वाचा भाग करावा, एवढाच बदल सुचवावासा वाटतो.

**प्रश्न ४) आजच्या नेत्यांकडून तरूणांपर्यंत खरा पुरोगामी विचार पोहोचवला जातोय का ?**

**उत्तर –** आपल्या राजकीय नेत्यांकडून खरा पुरोगामी विचार समाजापर्यंत पोहचविण्याची अपेक्षा करता येत नाही. ती अपेक्षा विचारवंतांकडून करायची असते.

**प्रश्न ५) पुरोगामित्वाच्या नावावर तरूणांची दिशाभूल किंवा त्यांच्या प्रगतीत अडथळा आणला जातोय असे वाटते का?**

**उत्तर –** स्वातंत्र्यानंतरची एक पिढी अशी दिशाभूल होत आलेली होती. मार्क्सवादी असणे, समाजवादी असणे, ही मोठी बहुमानाची व पुरोगामी असल्याची गोष्ट मानली जायची. सर्व घटनांचे व गोष्टींचे मूळ कार्यकारणातच असते, असे मानणे हे पुरोगामित्वाचे लक्षण मानले जायचे. त्यामुळे नवी शिकलेली पिढी या विचाराकडे आकृष्ट झाली होती. नेहरूंमुळे या विचाराला मोठी चालना मिळाली होती. समाजवादी व त्यातही मार्क्सवादी विचाराच्या मंडळींना शासनात, विविध शासकीय संस्थांत, विद्यापीठात, संशोधन संस्थांत मोठी पदे मिळत गेली. दिल्लीत जवाहरलाल नेहरू विद्यापीठ याच मंडळींसाठी स्थापन करण्यात आले. इतिहासाचा अभ्यासक्रम ठरविण्यात व त्या धोरणाचा भारतातील शिक्षणात प्रसार करण्यात याच विचाराच्या मंडळींचा पुढाकार होता. प्रसार माध्यमातही हीच मंडळी होती. अशा प्रकारच्या शासकीय प्रोत्साहनामुळे तरूण पिढी समाजवादी व मार्क्सवादी विचारांच्या प्रभावाखाली आली होती, परंतु रशियाच्या पतनानंतर सारे वातावरण बदलले. अर्थकारणातून साऱ्या गोष्टी घडतात, यातील फोलपणा तरूणांच्या लक्षात आला. हे तथाकथित पुरोगामी हिंदू धर्माची कठोर चिकित्सा करतात, हे तरूणांना पटू लागले. परंतु इस्लामसंबंधात हे पुरोगामी बोलत नाहीत, उलट मुसलमानांचा मूलतत्त्ववाद सांभाळून घेतात, हे त्यांच्या लक्षात येऊ लागले. पुरोगामी म्हणजे हिंदूविरोधी व मुस्लिमांच्या बाजूने होणारे पक्षपाती लोक अशी त्यांची जनमानसात प्रतिमा तयार झाली. परिणामत: तरूणातील पुरोगामीत्वाचे आकर्षण कमी झाले. महाराष्ट्रापुरते बोलायचे झाले तर नरहर कुरूंदकर, अ. भि. शहा, हमीद दलवाई यांच्यासारखे निवडक विचारवंतच काय ते खरा पुरोगामी विचार मांडू लागले. कुरूंदकरांनी तर इशारा देऊन ठेवला आहे की पुरोगाम्यांनी इस्लामच्या चिकित्सेकडे पाठ फिरविल्याने या हिंदू मूलतत्त्ववादाचा जोर वाढला. थोडक्यात, आता

*सामान्य माणसापुढे विचार असतो तो या जन्माचा, पण ध्येयवेडा माणूस मात्र ध्येयप्राप्तीसाठी शेकडो जन्म घ्यायलाही तयार असतो !*

पुरोगामीत्वाच्या नावावर तरूणांची दिशाभूल वैगेरे काहीही होत नाही. उलट पुरोगामी हेच समाजाची दिशाभूल करीत आहेत, अशी त्यांच्यात भावना पसरली आहे. आपल्याला असा पुरोगामी पाहिजे की जो सर्व धर्मांची कठोर चिकित्सा करतो व आधुनिक विचार मांडतो. त्याचेच दुर्भिक्ष्य आज लक्षात येऊ लागले आहे.

**प्रश्न ६) भारतीय संस्कृती म्हणजे प्रतिगामीपणा अशी मांडणी केली जाते. यामागची नेमकी कारणे काय आहेत?**

**उत्तर –** भारतीय संस्कृती म्हणजे प्रतिगामीपणा अशी सरसकट मांडणी कोणी करीत नाही. भारतीय संस्कृतीत किंवा कोणत्याही संस्कृतीत आजच्यासाठी चांगले व कालबाह्य झाले या अर्थाने वाईट असे दोन्हीही असते. भारतीय संस्कृतीतील चांगल्या गोष्टीचे कोणीही स्वागतच करील पण चांगले ठरवायचे कसे हा वादाचा मुद्दा होऊन बसतो. भारतीय संस्कृतीत चातुर्वर्ण्य, जातिव्यवस्था, स्त्री गुलामी, सामाजिक विषमता, श्रेष्ठ कनिष्ठ अशा अनेक कुप्रथा या गोष्टींचाही समावेश आहे. त्यामुळे या विषम तेचे बळी ठरलेल्या वर्गांना या संस्कृतीविषयी राग असणे स्वाभाविक होऊन बसते. भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठत्वाचे समर्थक अशाही वाईट गोष्टीचे आडवळणाने समर्थन करतात, त्यामुळे या वर्गांना या संस्कृतीविषयी राग येतो. अशा समर्थकांनी आधुनिक बनल्याशिवाय त्या संस्कृतीवर प्रतिगामी म्हणून टीका करणे थांबेल, असे वाटत नाही. सावरकरांनी जसे धर्मग्रंथ कालबाह्य झाल्याची घोषणा केली तशी करण्यास भारतीय संस्कृतीचे समर्थक तयार झाले पाहिजेत. तसे न होता हे समर्थक धर्मग्रंथाचे श्रेष्ठत्व सांगताना व गौरव करताना दिसतात व त्यामुळे भारतीय संस्कृतीवर प्रतिगामीपणाचा आरोप होत असतो. (अर्थात येथे भारतीय संस्कृती म्हणजे हिंदू संस्कृती एवढाच मर्यादित अर्थ घेतला जातो.)

**७) पुरोगामी दहशतवाद पसरवला जातोय का? असे करण्यामागे काय हेतू असतो?**

**उत्तर –** पुरोगामी दहशतवाद ही परसविण्याची गोष्टी नाही. हे लक्षात घेतले पाहिजे की, पुरोगामी हे दहशतवादी असतात, असे विधान मी केले नाही व तसे कधीही म्हणणार नाही. माझी तक्रार अशी की, हिंदू म्हणवून घेणाऱ्या प्रत्येकाला आणि पुरोगामी असणाऱ्या हिंदूलाही ते प्रतिगामी मानतात. खरोखर प्रतिगामी असणाऱ्या हिंदूला प्रतिगामी मानल्यास माझी काहीच हरकत नाही. समाजातून एखाद्याची प्रतिमा कमी व कलंकित करण्यासाठी ते प्रतिगामी शब्दाचा वापर करीत असतात.

**८) ४ थ्या मराठी विश्व साहित्य संमेलनातील आपण केलेल्या वक्तव्यामुळे तथाकथित पुरोगामी मंडळींनी वृत्तपत्रीय लेखातून आपल्याला हिंदुत्त्ववादी ठरविण्याचा उठाठेव केला त्याबद्दलआपण काय सांगाल?**

**उत्तर –** मी स्वत:ला कधीही सावरकरवादी वा हिंदुत्ववादी म्हणवून घेतले नाही. येथे खरा प्रश्न सावरकरवाद म्हणजे काय वा हिंदुत्ववाद म्हणजे काय हा आहे. पुरोगामी मंडळी सावरकरवाद म्हणून जे काही गृहित धरत असतात वा सांगत असतात तो एक त्यांचा मोठा गैरसमज वा जाणीवपूर्वक स्वीकारलेले अज्ञान आहे. वस्तुत: सावरकरवादात आपण ज्याला धर्म म्हणतो, त्यातील काहीच येत नाही. हिंदू असल्याचा मला अभिमान आहे, पण धर्म म्हणून मी काहीही पाळत नाही. समाजाची

> मी स्वत:ला कधीही सावरकरवादी वा हिंदुत्ववादी म्हणवून घेतले नाही. येथे खरा प्रश्न सावरकरवाद वा हिंदुत्ववाद म्हणजे काय हा आहे. पुरोगामी मंडळी सावरकरवाद म्हणून जे काही गृहित धरत असतात वा सांगत असतात तो एक त्यांचा मोठा गैरसमज वा जाणीवपूर्वक स्वीकारलेले अज्ञान आहे.

व राष्ट्राची उभारणी धर्मावर होता कामा नये, असे मी मानतो. भारतीय राज्यघटनेतील धर्मस्वातंत्र्याचा अर्थ आपण ज्याला हिंदूधर्म वा इस्लामधर्म मानतो तो धर्म पाळण्याचे स्वातंत्र्य नसून घटनेला अभिप्रेत असलेल्या धर्माच्या अर्थाचे स्वातंत्र्य आहे असे मी मानतो. घटनेने आपल्याला फक्त पारलौकिक अर्थाच्या धर्म पाळण्याचे स्वातंत्र्य दिले होय, असा धर्मस्वातंत्र्याचा अर्थ मी लेखातून व व्याख्यानातून मांडत असतो. हाच सेक्युलॅरिझमचा अर्थ आहे. मानवी जीवनाचे दोन भाग आहेत, एक पारलौकिक व अध्यात्मिक व दुसरा इहलौकिक. यातील पहिला भाग धर्माकडे व दुसरा इहलौकिक जीवनाचा भाग राज्याच्या अधिकारक्षेत्रात देण्यात आला आहे. हा माझा घटनेतील सेक्युलॅरिझमचा अर्थ होतो. व हाच अर्थ सर्वोच्च न्यायालयाने मान्य केलेला आहे. संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातही मी सेक्युलॅरिझमचा हाच अर्थ सांगितला आहे. तेव्हा मी हिंदुत्ववादी आहे, असे पुरोगामी म्हणत असतील तर त्या हिंदुत्ववादाचा अर्थ काय? हे त्यांनी स्पष्ट केले पाहिजे. व त्या अर्थाने मी हिंदुत्ववादी आहे हे दाखवून दिले पाहिजे. ते माझे विचार समजून न घेता, माझे ग्रंथ न वाचता एवढेच नाही तर माझे अध्यक्षीय भाषण न वाचता त्यांच्या अर्थाने मला हिंदुत्ववादी मानतात. हे मी आक्षेपार्ह मानतो.

सावरकरांच्या हिंदुत्वाचा अर्थ मी भाषणात सविस्तरपणे मांडला आहे. त्यानुसार धर्माचा विचार न करता सर्व नागरिकांना समान हक्क देणे व हिंदू म्हणून हिंदूवर अन्याय न करणे हेच सावरकरांचे हिंदुत्व होते. त्यांच्या हिंदुत्वाचा अर्थ हिंदुंचे न्यायहक्क रक्षण व त्यासाठी हिंदूंचे संघटन असा होता. माझ्या अध्यक्षीय भाषणातील त्या संबंधीचा निष्कर्ष येथे सांगतो. हिंदूंना हिंदू म्हणू नका आणि मुसलमानांना मुसलमान म्हणू नका. ख्रिश्चनांना ख्रिश्चन म्हणू नका. असे झाल्यावर हिंदूंना जे हक्क मिळतील त्यांनाच सावरकर हिंदूंचे न्यायहक्क रक्षण म्हणत. हेच त्यांचे हिंदुत्व होते.'' अशा प्रकारचे हिंदुत्व मी वा कोणी मानत असेल तर त्याला हिंदुत्ववादी मानणार की काय ? थोडक्यात सांगायचे म्हणजे, माझे विचार माहीत करून वा समजून न घेता पुरोगामी मंडळी मला त्यांच्या अर्थाने हिंदुत्ववादी मानतात, हे अत्यंत गैर व माझ्या दृष्टीने मानहानीकारक आहे. त्यांचा हिंदुत्वनिष्ठ असण्याचा अर्थ डॉ. कुमार सप्तर्षी यांनी आपल्या लोकमतमधील लेखात (१३/०९/२०१५) दिल्याप्रमाणे असा आहे. - हिंदूची खरी व्याख्या करायची असेल तर जो कर्मविपाक सिद्धांत मांडतो, जन्मावरून सत्ता, संपत्ती यांचे वाटप ज्याला मान्य आहे, जो जातिव्यवस्था मानतो व ज्याला अस्पश्यता मानतो तो हिंदू असे म्हणावे लागेल... जो हिंसेवर निष्ठा ठेवतो आणि जो हिंदू समाजाच्या उपरोक्त व्याख्येत बसतो, त्याला हिंदुत्ववादी म्हणतात.'' अशी व्याख्या करून माझ्यासारखा हिंदुत्ववादी म्हणणे हाच एक प्रकारचा पुरोगामी दहशतवाद आहे, असे माझे म्हणणे आहे.

**९) पुरोगामी दहशतवाद नेमका ओळखायचा कसा?**

**उत्तर :** बुद्धीवादी व पुरोगामी हिंदूंना जेव्हा हे पुरोगामी त्यांचे विचार माहिती करून न घेता प्रतिगामी म्हणून आरोप करतात, तेव्हा तो पुरोगामी दहशतवाद आहे असे समजावे.

**१०) आपण पुरोगामी दहशतवाद' या तटस्थपणे केलेल्या मांडणीमुळे तथाकथित पुरोगामी मंडळी आपल्याला बदनाम करतील किंवा करत आहेत याची भिती वाटते का?**

**उत्तर :** मला ते बदनाम करतील अशी भीती नाही. कारण त्यांनी मला प्रतिगामी म्हटल्यावर त्यांना उत्तर देण्यासाठी समाजासमोर माझे पुरोगामी विचार मांडण्यास मी समर्थ आहे. उलट त्यांनी मला प्रतिगामी म्हटल्यामुळे मला माझी बुद्धीवादी, पुरोगामी, सेक्युलर भूमिका मांडण्यासाठी संधीच मिळाली आहे. त्यांनी माझ्यावर प्रतिगामी म्हणून हल्लाच केला नसता तर ही मुलाखत तरी देण्याची संधी मला मिळाली असती काय?

***



# ब्रह्मदेवालाही आश्चर्यचकित करणारी - पुरोगामी बुद्धी

**रमेश पतंगे,** ज्येष्ठ विचारवंत, मुंबई

**कार्ल मार्क्सने जगाची विभागणी भांडवलदार आणि श्रमिक अशा दोन वर्गात केली. यापूर्वी इस्लाम धर्माचे संस्थापक महम्मद पैगंबर यांनी जगाची विभागणी दारूल-इस्लाम आणि दारूल -हरब अशा दोन भागात केली. ख्रिश्चनिटीने जगाची विभागणी विश्वास ठेवणारे आणि पॅगन, हिदेन अशी दोन भागात केली.अमेरिकेवरील दहशतवादी हल्ल्यानंतर राष्ट्राध्यक्ष बुश यांनी जगाची विभागणी अमेरिकेबरोबर असलेले देश आणि अमेरिकेच्या विरोधात असलेले देश अशा दोन भागात केली. महाराष्ट्रात शरद जोशी यांनी भारताची विभागणी इंडिया आणि भारत अशा दोन भागात केली. महाराष्ट्रातच समाजवादी आणि डाव्या लोकांनी महाराष्ट्राची विभागणी पुरोगामी आणि प्रतिगामी अशा दोन भागात करून टाकली.**

जगाची विभागणी अशा दोन भागात करणे, अनेक वेळा सोयीचे असते. विषय समजण्यासाठी अनेक वेळा विषयाची वर्गवारी करावी लागते. उदा-नुसत्या भाज्या म्हणून उपयोगाचे नसते. भाज्यांची वर्गवारी करावी लागते. फळभाज्या, पालेभाज्या, शेंगभाजी इत्यादी. धान्यांची देखील अशीच वर्गवारी करतात. पदार्थांची देखील अशी वर्गवारी केली जाते. उदा-जड पदार्थ आणि पातळ पदार्थ. ही सर्व वर्गवारी नैसर्गिक आणि शास्त्रीय असते. ही ज्ञानात भर घालते, विषय सोपा करते. परंतु माणसांची वर्गवारी आणि तीही पहिल्या परिच्छेदात दिल्याप्रमाणे करणे अत्यंत अशास्त्रीय असून या वर्गवारीने मनुष्यजातीचे भयंकर नुकसान केले आहे.

*शौर्य हे केवळ युद्धभूमीपुरतं मर्यादित नसतं, रोजच्या जीवनातही ते तितकंच आवश्यक आहे.*

इस्लामच्या दारूल इस्लाम आणि दारूल हरब या संकल्पनांमुळे मानवजातीत झालेला रक्तपात अतुलनीय आहे. इतिहासकार सांगतात की, इस्लामी आक्रमकांनी केवळ भारतातच सुमारे एक कोटी लोक ठार मारले असावेत. मार्क्सच्या भांडवलदार आणि श्रमिक वर्गाच्या सिद्धांतामुळे रशिया आणि चीनमध्ये अडीच कोटींहून अधिक लोक ठार मारले गेले. बुशने केलेली जगाची विभागणी तशीच आहे आणि अमेरिकेने मध्यपूर्वेत अफगाणिस्तानात किती लाख लोकांना ठार मारले हे आपण जाणतो. म्हणून मानवजातीची अशी विभागणी करणे याचा अर्थ कत्तलीचा परवाना देण्यासारखे आहे.



पुरोगामी आणि प्रतिगामी या दोन शब्दांनी आपल्या सुदैवाने इस्लाम किंवा कम्युनिझमप्रमाणे आपल्या देशात रक्ताचे पाट वाहवले नाहीत. त्याचे मुख्य कारण असे की, आपण हिंदू आहोत आणि हिंदू माणसाचा स्वभाव रक्तपात करण्याचा नाही. या दोन शब्दांनी जरी रक्तपात केला नसला तरी पुरोगामी शब्दाने महाराष्ट्र फार नासवून टाकलेला आहे. दूध नासतं, भाजी नासते, आणि मग ती खाण्या-पिण्याच्या दृष्टीने अयोग्य होते. तिच्यात विषारी द्रव्य तयार होतात, म्हणून ती फेकून द्यावी लागते. पुरोगामी आणि प्रतिगामी या शब्दांनी महाराष्ट्रात जे विष निर्माण केले आहे ते समाजजीवनाला अत्यंत घातक आहेत यासाठी ते टाकून देणे, त्यांना फेकून देणे अत्यंत आवश्यक झाले आहे.

## महाराष्ट्राची परंपरा

काय होती महाराष्ट्राची परंपरा? १८३२ च्या दशकापासून महाराष्ट्रात प्रबोधन पर्वाला प्रारंभ झाला असे मानण्यात येते. १८३२ साली दर्पण साप्ताहिक सुरू झाले, त्यानंतर ज्ञानोदय, विविध ज्ञान, विस्तार अशी नियतकालिके सुरू झाली. आगरकरांचे सुधारक पत्र सुरू झाले. टिळकांचा केसरी-मराठा सुरू झाला. महात्मा फुलेंनी दीनबंधू सुरू केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी जनता, मूकनायक, बहिष्कृत भारत अशी नियतकालिके सुरू केली. अशा नियतकालिकांची यादी खूप मोठी आहे. या सर्वांनी हिंदू समाजातील दोषांवर प्रहार करायला सुरूवात केली. यातील हिंदू समाज हा शब्दप्रयोग अधोरेखित केला पाहिजे.

कोणते प्रश्न त्यांनी हाती घेतले? त्यांनी स्त्रियांच्या शिक्षणाचा प्रश्न, अस्पृश्यांचा प्रश्न, त्यांच्या शिक्षणाचा प्रश्न, विधवा विवाहांचा प्रश्न, विवाहाची वयोमर्यादा ठरविण्याचा प्रश्न, सार्वजनिक पाणवठ्याचे प्रश्न, शेतकऱ्यांचे प्रश्न, रोजगाराचे प्रश्न हाती घेतले. हे सर्व प्रश्न हिंदू समाजातील प्रश्न होते. अस्पृश्यता हिंदू समाजात पाळली जाते, विधवांचे विवाह हिंदू समाजात होत नसत, हिंदू समाजात स्त्रियांना शिक्षणापासून वंचित ठेवले होते. हे सर्व मांडणारे हिंदू होते. ते जे मांडत ते वाचणारेही हिंदू होते. त्यामुळे या सर्वांचे प्रयत्न हिंदू समाज सुधारण्याचे, हिंदू समाजाला निर्दोष करण्याचे, हिंदू समाजाला जातिभेदापासून मुक्त करण्याचे होते. त्याचे कारण स्वच्छ होते की, जोपर्यंत हिंदू समाज दोषमुक्त होत नाही आणि आधुनकितेला सामोरा जात नाही तोपर्यंत इंग्रजांचे राज्य येथून जाणे कठीण आहे.

## चिंता हिंदूंची

हे काम करताना अनेकांनी हिंदू धर्माची, हिंदू धर्मशास्त्रांची, हिंदू रितीरिवाजांची, ब्राह्मणशाहीची

निव्वळ शस्त्रांनी युद्ध लढले जात नाही. ती केवळ साधने असतात. खरा लढतो तो अपार धैर्य उरात बाळगणारा माणूस !

कठोर चिकित्सा केली आहे. महात्मा फुले यांची भाषा रागंडी आणि तिखट आहे. तशीच ती बाबासाहेबांचीही आहे.लोकहितवादी आणि आगरकरांची भाषादेखील तिखटच आहे. परंतु आपल्या समाजाचे वैशिष्ट्य असे आहे की, टिकाकाराची भावना तो पाहतो, त्याच्या मनातील भाव तो पाहतो आणि त्यावरून त्या-त्या माणसाचे मूल्यमापन करतो. अन्य धर्मीय समाजात धार्मिक टिकाकाराला जिवंत ठेवले जात नाही, असे हिंदू समाजात होत नाही. वेद नाकारणारा गौतम हा हिंदूच्या दृष्टीने भगवान होतो आणि वेद प्रामाण्य स्वीकारणाऱ्या शंकराचार्याबरोबर त्याचीही पूजा केली जाते. वरवर अभ्यास करणाऱ्यांना ही विसंगती वाटते. परंतु ज्यांना हिंदू समाजाचे मानस समजते, त्यांना यात सुसंगती वाटते.

या चळवळीत अपवादाने एखादा मुसलमान, एखादा ख्रिश्चन, एखादा पारशी सहभागी झालेला दिसतो. तो सहभागी झालेला दिसतो याचे कारण आपली राष्ट्रीय ओळख तो विसरलेला नसतो. या राष्ट्रीय ओळखीपायी तो राष्ट्रीय समस्या समजून घेतो आणि त्यात सहभागी होतो. परंतु हिंदू सोडून सर्व अन्य समाज समूहरूपाने समाज प्रबोधनाच्या चळवळीत उतरला होता असे विधान करता येत नाही.

## महाराष्ट्राची आघाडी

देशाची तुलना करता अन्य प्रांतापेक्षा महाराष्ट्राने सामाजिक प्रबोधनात खूप मोठी आघाडी मारली. उत्तरेच्या काही राज्यांशी तुलना केली असता ही गोष्ट नीटपणे लक्षात येते. यामुळे महाराष्ट्रात बुध्दीचा विकास अन्य राज्यांपेक्षा खूप झाला. चित्रपटसृष्टीचा पाया घालणारे दादासाहेब फाळके महाराष्ट्राचे, यशस्वी विमानउड्डाण करून दाखविणारे तुळपुळे महाराष्ट्राचे, मार्क्सच्या अगोदर साम्यवादी सिध्दांत मांडणारे विष्णुबुवा ब्रह्मचारी महाराष्ट्राचे, देशाला राजकीयदृष्ट्या जागरूक करणारे लोकमान्य टिळक महाराष्ट्राचे, पन्नास वर्षांची काळ्यापाण्याची शिक्षा झालेले सावरकरदेखील महाराष्ट्राचे, संगीत नाटकाची परंपरा महाराष्ट्राची, स्वर्गीय गायक बालगंधर्व महाराष्ट्राचे, महाराष्ट्राचे असे पराक्रम खूप आहेत आणि त्याचे श्रेय महाराष्ट्रात निरंतर चालणाऱ्या प्रबोधनपर्वाला द्यावे लागते.

देशाला १९४७ साली स्वातंत्र्य मिळाले. सर्व संदर्भ बदलले. १९४७ सालापूर्वी देशात राष्ट्रकारण चालत असे. १९४७ नंतर राजकारणाला सुरूवात झाली. राष्ट्राकारणात राष्ट्र बलशाली करायचे आहे. राष्ट्र सर्वांचे आहे, त्यासाठी सर्वांचा विकास झाला पाहिजे, वंदे मातरम्ची भावना होती. म्हणजे आमची आई भारतमाता, आम्ही सर्व तिचे संतान, आम्हाला सर्वांना मिळून भारतमातेला वैभवसंपन्न करायचे आहे, ही आकांक्षा होती. आता आकांक्षा झाली सत्ता मिळविण्याची. आपण लोकशाहीची राज्यपध्दती स्वीकारली आणि संसदीय लोकशाही उचलली. संसदीय लोकशाहीत जो सर्वाधिक मते मिळवील तो विजयी, हा सिध्दांत मुख्य झाला. सर्वाधिक मते याचा अर्थ म्हणजे बहुसंख्य मते नव्हेत. उदा-१० मते आहेत आणि १० उमेदवार आहे. एकाला २ मते मिळाली तरी तो विजयी होतो. राहिलेली ८ मते ९ उमेदवारांत विभागून जातात. इंग्रजीत याला फर्स्ट पास्ट द पोस्ट असे म्हणतात.

आपल्याकडचे राजकीय पक्ष अतिशय चतुर झाले. त्यांनी प्रत्येक मतदारसंघाचा भराभरा अभ्यास सुरू केला. कोणत्या जातीची माणसे जास्त आहेत याचा शोध घेतला. निवडून यायचे असेल तर बहुसंख्य जातीचा उमेदवार हवा. अल्पसंख्य जास्त संख्येत असेल तर मुसलमान किंवा ख्रिश्चन उमेदवार हवा. हे झाले सामान्य गणित. नंतर मग दोन-तीन जातींची संख्या एकत्र करायची, यात अल्पसंख्य मिळवायचे आणि विजयाचा हमखास फॉर्म्युला तयार करायचा. याला महाराष्ट्रातील विचारवंतांनी नाव दिले पुरोगामी राजकारण. कोणी त्याला बेरजेचे राजकारण म्हटले, तर कोणी त्याला धर्मनिरपेक्ष राजकारण म्हटले, आजचा शब्द आहे सेक्युलर राजकारण.

## नवीन शब्द

या राजकारणाने नवीन शब्दप्रयोग दिले.

महाराष्ट्राच्या पुरोगाम्यांनी शब्द दिला-माधव. त्याचा अर्थ होतो- महार, धनगर, वंजारी यांची युती करा आणि राज्य मिळवा. दुसरा एक शब्दप्रयोग आला - अजगर. याचा अर्थ होतो - अहिर, जाट, गुजर, रजपूत. यांना शह देण्यासाठी आणखी एक पुरोगामी शब्द आला - मजगर. म्हणजे - मुसलमान, जाट, गुजर आणि रजपूत. गुजरातने शब्दप्रयोग केला खाम. याचा अर्थ होतो-खत्री, आदिवासी आणि मुसलमान. हे राजकारणातील पुरोगामी शब्द झाले. हळूहळू ते परवलीचे शब्द झाले. जो कोणी या शब्दांचा उपयोग करणार नाही तो प्रतिगामी झाला. दलित आदिवासी, मुस्लिमविरोधी झाला.

महाराष्ट्रातील आणि देशातील राजकारण्यांनी कालचक्र उलटे फिरविण्याचे राजकारण केले. जी जातियता आणि धार्मिकता समाजातून स्वातंत्र्यानंतर वेगाने संपायला पाहिजे होती, त्याऐवजी ती वेगाने अधिक घट्ट होत चालली आहे. पूर्वी लोक स्वत:ची जात लपविण्याचा प्रयत्न करीत किंवा आपण उच्च जातीचे आहोत हे सांगण्याचा प्रयत्न करीत. आज प्रत्येकजण आपली जात विसरत नाही आणि प्रत्येक जात आपण कसे मागास आहोत किंवा अतिमागास आहोत हे सांगण्याचा प्रयत्न करते. पुरोगामी राजकारणाने दिलेली ही देणगी आहे. पुरोगाम्यांनी महाराष्ट्र कसा नासवला तर असा. त्यांनी महाराष्ट्राच्या राजकारणाचे जातीकरण करून टाकले आणि जातीचे भूत जागृत केले. जातीचा विषारी कुंभ त्यांनी राजकारणात आणून ठेवला.

स्वातंत्र्यानंतर सहमतीने राज्य निर्माण करण्याची आणि सर्वांना बरोबर घेऊन जाण्याची गरज होती. नेहरू यांनी हे करणे आवश्यक होते. त्यांनी उलटे केले. कमालीची वैचारिक असहिष्णूता याचे दुसरे नाव म्हणजे नेहरू. १९४८ साली गांधीजींची हत्या झाली. नेहरूंनी सावरकरांना त्यात गोवले. मला या माणसाचे रक्त हवे, असे वाक्य त्यांनी उच्चारले. गांधी हत्येत त्यांना फासावर लटकविण्याचा त्यांचा विचार असावा. सावरकर ही व्यक्ती नव्हती, सावरकर हा एक विचार होता.सावरकरांचा विचार हिंदुत्त्वाचा विचार होता. नेहरू यांना तो सहन होत नव्हता. माणसाला मारून ते विचार संपविण्याचा प्रयत्न करीत होते. माणसाला मारून किंवा बदनाम करून विचार संपत नसतात. तसा मनुष्यजातीचा इतिहास नाही. तसे झाले असते तर कोपर्निकस आणि गॅलिलिओ यांना बंदी करून विज्ञान संपविता आले असते.

## पुरोगाम्यांचे देवदूत

नेहरू पुरोगाम्यांचे देवदूत झाले, मसिहा झाले. महाराष्ट्रातील थोर विचारवंत नरहर कुरूंदकर यांचे नेहरू दैवतच होते आणि कुरूंदकर हे महाराष्ट्रातील पुरोगामी महर्षी ठरतात. एखाद्याला झोडायाचे असेल तर युक्तिवादाने कसे झोडायचे हे त्यांच्याकडून शिकण्यासारखे आहे. श्रीगुरूजी चातुर्वर्ण्य आणि विषमतेचे समर्थक होते, हे कुरूंदकर फार सुंदर रितीने पटवून देतात. त्यांचे दुर्दैव एवढेच की, माझ्यासारख्या लाखो लोकांची हयात गुरूजींच्या चरणाशी बसून गेली. त्यांना गुरूजी म्हणजे समरसतेचा चालता-बोलता, जिता -जागता आदर्शच वाटत. युक्तिवादाची साधने फार धोकेबाज असतात आणि तिचा वापर माणसाच्या मेंदूवर असतो. उदा- बायकोला मारायचे सोडले की नाही? या प्रश्नाचे उत्तर हो किंवा नाही असे द्या, तर काय होईल? हो म्हटले की बायकोला मारतो असे होईल आणि नाही म्हटले तरही बायकोला मारतो असेच होईल. म्हणून युक्तिवादाची पुस्तके फार जपून वाचावी लागतात. त्या जाळयात आपण फसणार नाही याची काळजी घ्यावी लागते.

महाराष्ट्रात पुरोगामी शिष्यसंप्रदाय फार मोठा आहे. त्यांचे काही सिध्दांत आहेत. सिध्दांत क्रमांक १ - हिंदुत्व ही संकुचित संकल्पना आहे. २ - ती सेक्युलॅरिझमच्या विरूध्द आहे. ३ - ती धार्मिक आहे. ४ - ती राज्यघटनेच्या सर्वधर्म समभावाविरूध्द आहे. ५ - हिंदुत्व ही धार्मिक संकल्पना आहे. ६ - त्यामुळे ती मुसलमान, ख्रिश्चन, ज्यू, पारशी, शीख, जैन, बौध्द यांच्या विरोधी आहे. ७ - हिंदुराष्ट्राची गोष्ट

*स्वार्थ साधण्याच्या दृष्टिकोनातून केलेली प्रत्येक कृती, प्रत्येक सेवा ही हलक्या दर्जाची असते.*

करणे म्हणजे देशाची धार्मिक विभागणी करणे. ८ - हिंदू हा ब्राह्मणी धर्म आहे. ९ ब्राह्मण आर्य आक्रमक आहेत. १० - हिंदुत्ववाद्यांना मनुचे राज्य आणायचे आहे. ११ - हिंदुत्ववाद्यांना मुसलमान आणि ख्रिश्चन यांचा वंशविच्छेद करायचा आहे. १२ - त्यासाठी त्यांना राज्यसत्ता हवी आहे. १३ - हिंदू नावाचा समाज नसून जातींच्या समूहाला हिंदू म्हणायचे. १४ - प्रत्येक जातीचे स्वतंत्र अस्तित्व आहे. १५ - आदिवासी आणि दलित यांना स्वतंत्र अस्मिता आहे, त्यांचा धर्म देखील वेगळा आहे. १६ - प्रत्येकाचे अस्तित्व वेगळे ठेऊन आपल्याला एक देश उभा करायचा आहे.

### प्रतिगामी कोण?

ही झाली पुरोगामी सूत्रे. ती ज्यांना मान्य आहेत, ते पुरोगामी आणि ज्यांना मान्य नाहीत ते प्रतिगामी. पुरोगाम्यांच्या भाषेत मी प्रतिगाम्यांच्या श्रेणीत येतो. या सूत्रांची काही वैशिष्ट्ये आहेत. पूर्वी एकेकाळी महाराष्ट्रात वादचर्चा होत. अत्रे-माटे वाद, अत्रे-फडके वाद खूप गाजले. त्याचप्रमाणे श्लील आणि अश्लील यावरचे देखील वाद झालेले आहेत. पुरोगामी मंहत हे असे वाद करीत नाहीत. ते मंहत असल्यामुळे त्यांना आपण प्रश्न विचारायचे नसतात, त्यांचे म्हणणे निमुटपणे मान्य करायचे असते.

तुम्ही प्रश्न विचारला की सगळी फलटण तुमच्या अंगावर अशी काही धावून येते की काही विचारू नका. दोन साहित्य संमेलनात याचा मी अनुभव घेतला आहे. मी त्यांना कवडीचीही भीक घालीत नाही ही गोष्ट वेगळी.

याचे दुसरे वैशिष्ट्य असे की, ही सर्व सूत्रे स्वयंसिध्द सत्य आहेत. त्यामुळे ही सिध्द करण्याची जबाबदारी आमच्यावर नाही अशी पुरोगाम्यांची मानसिकता असते. उदा-हिंदुत्व हे धार्मिक कसे? संघ असे म्हणत नाही, सावरकर असे म्हणत नाहीत, आर्य ब्राह्मण भारतात बाहेरून आले, याला पुरावा काय? बाबासाहेबांनी तर हा सिध्दांत नाकारलेला आहे. हिंदुत्ववाद्यांना मनुचे राज्य आणायचे आहे, हे शक्य आहे का? अशा सर्व प्रश्नांची पुरोगामी उत्तरे असतात, तुम्हाला काही समजत नाही, तुमचे ज्ञान अपुरे आहे, बाबासाहेबांना असे म्हणायचे नव्हते, संघाचे हिंदुत्व धार्मिकच आहे, सावरकर तुम्हाला समजले नाहीत, ते तर हिंदू आणि मुसलमान वेगवेगळी राष्ट्र आहेत असे म्हणत. आपणही पुरोगामी उत्तरे स्वीकारायची असतात आणि त्यांच्या कळपात जाऊन बसायचे असते.

कळपात जाऊन बसले की फायदेच फायदे. यांना पाळणारे आणि पोसणारे राजनेते त्यांना वेगवेगळ्या सरकारी समित्यांवर पाठवितात. तेथे खाण्या-पिण्याची चंगळ असते. विविध पुरस्कार मिळतात. लायकी नसताना ज्ञानपीठ, साहित्य अकादमीचे पुरस्कार प्राप्त होतात. गावगन्ना पुरस्कार देणाऱ्या संस्था भरपूर असतात. काही आपणच उभ्या करायच्या असतात. आपणच त्यांच्याकडे निधी द्यायचा असतो आणि त्यांना सांगायचे असते की मला पुरस्कार द्या, माझा सत्कार करा. असे काही केल्याशिवाय पुरोगामी हे बिरूद लागत नाही.

### वर्षभराचा शिमगा

फाल्गुन महिन्यात शिमगा येतो आणि त्या एकाच दिवशी ज्या काही शिव्या द्यायच्या असतात त्या देऊन टाकायच्या असतात. महाराष्ट्रात मात्र बाराही महिने पुरोगामी शिमगा असतो. त्यासाठी खास वर्तमानपत्रे चालविण्यात येतात. दूरदर्शनच्या वाहिन्याही त्यांच्यासाठी राखीव आहेत. तीच सत्तरी-ऐंशीत पोहचलेली पुरोगामी मंडळी '... पीट पीट कर गला फाड कर चिल्लाना' सुरू करतात आणि औषधाला एखादा अपुरोगामी किंवा पुरोगाम्यांच्या भाषेत प्रतिगामी चर्चेत असतो. त्याला बोलूच द्यायचा नाही अशी फिल्डिंग लागलेली असते आणि ते मग जे युक्तिवाद करतात ते सर्व युक्तिवाद ऐकून ब्रह्मदेव जर जागा असेल तर तोही आश्चर्याने तोंडात बोटे घातल्याशिवाय राहणार नाही.

ब्रह्मदेवाचे नाव घेतल्यामुळे एक गोष्ट आठवली. ब्रह्मदेवाने मनुष्यासहित प्राणीसृष्टी निर्माण केली.

प्रत्येक प्राण्याला त्याने एक-एक शक्ती दिली.कोणाला धावण्याची, कोणाला उडण्याची, कोणाला पोहण्याची, कोणाला शिकार करण्याची, माणसाला त्याने काही दिले नाही, असे माणसाला वाटले. म्हणून त्याने देवाकडे तक्रार केली.

ब्रह्मदेव त्याला म्हणाला, 'बाबा रे, मी तुला बुध्दी दिली आहे, जी इतर कुठल्याही प्राण्याला दिलेली नाही, तिचा तू नीट वापर कर, सृष्टीच्या कल्याणासाठी वापर कर, सर्वांच्या सुखासाठी वापर कर.'

ब्रह्मदेवाने पाहिले की, महाराष्ट्रात पुरोगामी जात तयार झालेली आहे आणि ती बुध्दीचा मला कल्पना येणार नाही असा वापर करते, धन्य आहे पुरोगामी! या जमातीने नंग्या जातिवादाला सामाजिक न्याय म्हटले, या जमातीने मुस्लिम दहशतवाद आणि आंतकवादाला सेक्युलॅरिझमचे नाव दिले, या जमातीने ख्रिस्तीकरण मोहिमेला धार्मिक सलोखा मोहिमेचे नाव दिले, या जमातीला अंधश्रध्दा फक्त हिंदू समाजाच्याच दिसतात. मुस्लिम बोकड कापतात, तेव्हा त्यांना प्राणीहिंसा झाली आहे असे वाटत नाही, पण कुठेतरी कोंबडीचा बळी दिल्यानंतर यांच्या पोटात कळा यायला लागतात. जाती आणि धर्मांच्या मतबँका उभ्या करून मत मागताना यांना देशाच्या सर्वधर्म समभावाची आठवण येते. ते बघून ब्रह्मदेवाने आश्चर्याने तोंडात बोट घातले. शब्दांचे असेही अर्थ होतात, हे समजून तो पुरोगामी बुध्दीविषयी विचार करू लागला की, खरोखरच मी यांना बुध्दी दिली आहे का?

## गांधीजींची आठवण केव्हा

महाराष्ट्रातील पुरोगाम्यांनी छत्रपती शिवाजी महाराजांना मराठा राजा ठरवून टाकले आहे. पू. डॉ. बाबासाहेबांना दलित नेता ठरवून टाकले आहे. श्रीगुरूजींना कट्टर सांप्रदायिक नेता ठरवून टाकले आहे. प्रखर बुध्दीवादी सावरकरांना सांप्रदायिक नेता ठरवून टाकले आहे. महात्मा गांधींची आठवण त्यांना अन्य कधीही होत नाही. एखाद्या मुसलमानाची हत्या झाली, सलमान खान कैदेत जाण्याची वेळ आली, संजय दत्त कैदेत गेल्यानंतर त्यांना गांधीजींची आठवण येते. जीव कासावीस होतो आणि मग ते सामुहिकपणे रडू लागतात. नरेंद्र मोदी पंतप्रधान झाले की यांना जुलाब सुरू होतात.आता देशाचे काय होणार? आमचे काय होणार? आमच्या पोटापाण्याची सोय कोण करणार? आम्हाला सेमिनारला कोण बोलविणार? आम्हाला विदेशवारी कोण घडवून आणणार? अशा वेळी त्यांना महात्मा गांधीजींची आठवण येते. गांधीजींच्या देशाचे काय होणार? या चिंतेने ते कासावीस होतात. अन्य वेळी त्यांना गांधी आठवतच नाही. गांधीजी म्हणाले,. गोहत्याबंदी करा, गांधीजी म्हणाले, साधे रहा, गांधीजी म्हणाले, चारित्र्याची जोपासना करा, गांधीजी म्हणाले, गरीबातल्या गरीब म णसाची सेवा करा. गांधीजी म्हणाले, सत्याची कास सोडू नका, गांधीजी म्हणाले, हिंदू असल्याचा अभिमान धरा. पुरोगाम्यांनी हा गांधी प्रतिगामी, पुराणपंथी ठरवून टाकलेला आहे आणि त्यांची अपेक्षा अशी असते की ते आपण मान्य केले पाहिजे.

## पुरोगामी गाढव

आपले सुदैव असे की, एक गाढव देखील स्वत:ला पुरोगामी म्हणायला तयार नसतो. सर्व प्राण्यात गाढवाला 'गाढव' मानण्यात आले आहे. एक वडारी होता त्याच्याकडे एक गाढव होता. तो प्रत्येक विषयाला हो-हो करीत असे. कोणीही जा त्याला कोणताही प्रश्न विचारला तर तो उभी मान हलवून उत्तर देई. एकदा एक पैज लागते की जो कोणी गाढवाला नकाराची मान हलवायला लावेल त्याला एक हजार रूपये बक्षिस मिळेल. एक प्रतिगामी तरूण गाढवाजवळ जातो आणि गाढवाच्या कानात काहीतरी पुटपुटतो आणि गाढव नाही नाही म्हणून मान हलवू लागतो. लोकांना आश्चर्य वाटते. ते त्या तरूणाला विचारतात की तू त्याच्या कानात काय बोललास. तरूण म्हणतो, 'मी गाढवाला म्हणालो, तू पुरोगामी होतोस का?'

***




# धर्मनिरपेक्षतावाद्यांना मुस्लिम रक्ताची चटक



**तुफैल अहमद**

*ब्रिटीश पत्रकार व वॉशिंग्टन डी.सी. येथील मिडल ईस्ट मीडिया इन्स्टिट्यूटच्या साऊथ एशिया स्टडीजचे संचालक.*

दादरी येथील बिसाहडामध्ये गोमांस खाल्ल्याच्या आरोपातून झालेल्या महमद इकलाख याच्या हत्येने लोकांत संताप आहे. काहींचे म्हणणे आहे की, इकलाखच्या हत्येमुळे ते संतप्त आहेत तर त्याचवेळी काहींचे म्हणणे आहे की, गायीची हत्या केल्याने ते संतप्त आहेत. काही लोक शिवसेनेच्या धमकीमुळे पाकिस्तानी गजल गायक गुलाम अली यांचा नऊ ऑक्टोबरला मुंबईत होणारा कार्यक्रम रद्द झाल्याने संतप्त आहेत तर दुसरे लोक पाकिस्तानी अभिनेते आणि गायकांना भारतात बोलावण्यावरून संतप्त आहेत. हा दावा खोटा आहे की, आपण मानवाच्या जीवनाविषयी चिंतित आहोत. अहिंसेवर विश्वास असल्याचा दावा करणारे अनेक लोक मांसाहारी आहेत आणि त्यासाठी एका प्राण्याची हत्या केल्याचे माहीत असूनही ते मांस खातात. शुद्ध मानवीय विचारानुसार प्राण्याचे जीवन मनुष्याच्या जीवनाहून कमी किमतीचे असू शकत नाही. शाकाहारींमध्ये जैन आदरणीय आहेत

**भारतीय धर्मनिरपेक्षतावाद राष्ट्रवादाला प्रतिकूलही आहे. धर्मनिरपेक्ष वकील दहशतवादी याकूब मेमनचा जीव वाचवण्यासाठी अर्ध्या रात्री उच्च न्यायालयात पोहोचले. परंतु सर्वसामान्य भारतीयाच्या फाशीच्या शिक्षेवर ते गप्प बसून राहतात. निखिल वागळे यांनी लिहिले : 'धर्मनिरपेक्षतेविना भारत हिंदू पाकिस्तान आहे.' भारतीय धर्मनिरपेक्षता भारतीयही नाही. हे गोमांस खाल्ल्याशिवाय अपूर्ण आहे. हे गोमांस खाणे पसंद करते कारण पाकिस्तानी गोमांस खातात. ही मूळात पाकिस्तानी आहे.**

कारण ते जीवजंतूंनाही हानी पोहोचवण्याचा विचार करत नाहीत. याचा अर्थ हा नव्हे की, सर्व जैन शाकाहारी आहेत अथवा कोणतीही हत्या करत नाहीत.

गेल्या २३ जूनला पाकिस्तानी पोलिसांनी खेळण्यातील बंदुकीसह सेल्फी घेणाऱ्या एका मुलाची हत्या केली. परंतु पाकिस्तानी जनतेने याचा विरोध केला नाही. जर इस्त्रायली पोलिसांच्या गोळीने एखादा पॅलेस्टिनी मुलगा जखमी झाला तर जगभरातील डावे प्रदर्शन करतील तसेच पत्रकारही वार्तांकन करतील. जेव्हा अमेरिकेने इराकवर हल्ला केला तेव्हा युद्धविरोधी कार्यकर्त्यांनी जगभरात निषेध केला. नुकतेच जेव्हा सौदी अरेबियाने यमनवर हवाई हल्ले केले तेव्हा युद्धविरोधी कार्यकर्ता झोपी गेले. पाकिस्तानी सेना बलुचिस्तानात नेहमीच लोकांची हत्या करते. परंतु पाकिस्तानी याच्याविरोधात उभे राहत नाहीत. भारतात मानवाधिकाराच्या चिंतेचा दावा करणाऱ्या धर्मनिरपेक्ष पत्रकारांना पीडित हिंदू असेल तर राग येत नाही. भारतीय धर्मनिरपेक्षतावादींच्या डोळ्यांवर एक विशिष्ट प्रकारचा खास चष्मा चढला आहे. इकलाखच्या हत्येने संतप्त धर्मनिरपेक्ष पत्रकारांनी अनेक हत्यांवर सोयिस्कर मौन बाळगले. मागच्या ऑगस्टमध्ये सैनिक वेदमित्र चौधरी याचा मेरठजवळील हरदेवनगरात जमावाने मारहाण करुन खून केला. मार्चमध्ये मुस्लिम मुलीशी लग्न केल्याने बिहारच्या हाजीपूर येथे एका हिंदूची हत्या करण्यात आली. मागच्या जूनमध्ये आंध्रप्रदेशातील इलुरूजवळ एकाला जमावाने ठार मारले. जूनमध्ये मुंबईच्या पश्चिम भांडुप भागात जमावाने एकाचा खून केला. धर्मनिरपेक्ष पत्रकारांचे चष्मे अशी हत्याकांडे पाहण्यास रोखतात. भारतीय धर्मनिरपेक्षतावाद्यांना मुस्लिम रक्ताची चटक लागली आहे.





भारतीय धर्मनिरपेक्षतावाद्यांवर चढलेला चष्मा एखाद्या विशिष्ट रंगाचाच नव्हे तर तो अर्धा पाकिस्तानीही आहे. धर्मनिरपेक्ष अखिलेश यादव यांनी लखनौमध्ये गुलाम अलीचा पाहुणचार केला. अरविंद केजरीवाल यांनीही गुलाम अली यांचा दिल्लीत कार्यक्रम ठरवला. परंतु केजरीवाल तसेच अखिलेश यांनी ऑस्कर विजेता संगीतकार ए. आर. रहमानला आमंत्रित केले नाही, जेव्हा बरेलवी येथील रजा अकादमी संघटनेच्या फतव्यामुळे १३ सप्टेंबरला दिल्लीमधील त्यांचा कार्यक्रम रद्द केला गेला. धर्मनिरपेक्षता भारतीय मुस्लिम गायकांना पसंदच करत नाही. हे सलमान रश्दी यांच्यासारख्या भारतीय लेखकांनाही पसंद करत नाही. आणखी एक धर्मनिरपेक्ष नेत्या ममता बॅनर्जी याही संगीताला कोणतीही आंतरराष्ट्रीय सीमा नसते, असे सांगत गुलाम अली यांच्या समर्थनार्थ उभ्या राहिल्या. परंतु त्या बांग्लादेशी लेखिका तस्लीमा नसरीन यांचे समर्थन करणार नाहीत. भारतीय धर्मनिरपेक्षता



Shobhaa De
@DeShobhaa

I just ate beef. Come and murder me.

12:06 PM - 1 Oct 2015

413 299

Follow



खरोखरच पाकिस्तानी आहे. भारतीय धर्मनिरपेक्षतावाद राष्ट्रवादाला प्रतिकूलही आहे. धर्मनिरपेक्ष वकील दहशतवादी याकूब मेमनचा जीव वाचवण्यासाठी अर्ध्या रात्री उच्च न्यायालयात पोहोचले. परंतु सर्वसामान्य भारतीयाच्या फाशीच्या शिक्षेवर ते गप्प बसून राहतात. निखिल वागळे यांनी लिहिले : 'धर्मनिरपेक्षतेविना भारत हिंदू पाकिस्तान आहे.' भारतीय धर्मनिरपेक्षता भारतीयही नाही. हे गोमांस खाल्ल्याशिवाय अपूर्ण आहे. हे गोमांस खाणे पसंद करते कारण पाकिस्तानी गोमांस खातात. ही मूळात पाकिस्तानी आहे. १९४७ मध्ये आपल्या लोकांनी विचार केला की भारतीय भूभागाचा एक तुकडा सोडल्यास शांती मिळवू शकू. परंतु मनमोहनसिंग यांचे धर्मनिरपेक्ष सरकार कारगिलमध्ये आधुनिक काळातील सर्वात मोठा जिहाद उभारणाऱ्या मुशर्रफ यांच्यासोबतच्या बोलणीत काश्मीरचा एक भाग पाकिस्तानला देण्यापर्यंतच्या निर्णयाच्या अधिक जवळ पोहोचले होते.

आपल्या ऐतिहासिक पुस्तक 'ऑन वॉर' मध्ये जर्मन सैन्य रणनीतिज्ज्ञ कार्ल नॉव क्लॉसविज ने लिहिले आहे : 'राजकारणाला युद्ध वेगळ्या पद्धतींनी सुरू ठेवायचे आहे.' भारतीयांना पाकिस्तानी गायक येथे येऊ नयेत, असे वाटते कारण पाकिस्तान भारताच्या विरोधात एकाप्रकारे युद्धच लढत आहे. टीव्ही तसेच सोशल मीडियाच्या माध्यमातून भारतीय वेगळ्या पद्धतींनी सुरू असलेल्या युद्धाला समजतात. पाकिस्तानने औपचारिकरीत्या युद्धाची घोषणा केली नाही परंतु भारतीय हे तथ्य जाणून आहेत की ते युद्धजन्य स्थितीत आहेत. आमीर खानचा चित्रपट 'सरफरोश' ने आपल्याला दाखवले की, पाकिस्तान गजल गायकांच्या वेशात शस्त्र तस्करांना पाठवते. भारतीय धर्मनिरपेक्षता इस्लामीही आहे. २०१२ मध्ये धर्मनिरपेक्ष कॉंग्रेस सरकारने जयपूरमध्ये सलमान रश्दी यांना बोलण्याची परवानगी दिली नाही कारण धर्मनिरपेक्षतावादाचे इस्लामी लोकांशी जवळचे नाते आहे. ममता बॅनर्जी तस्लीमा नसरीन यांचे समर्थन करत नाही कारण त्यांची आपल्या राज्यात इस्लामी लोकांशी खुली आघाडी आहे. २०१३ मध्ये केजरीवाल हे मुस्लिम मतांसाठी इस्लामी धार्मिक नेता तौकीर रजा खानला भेटण्यासाठी बरेलीला गेले होते. १९८६ मध्ये शहाबानो खटल्यात राजीव गांधींच्या धर्मनिरपेक्षतावादाने इस्लामी धार्मिक नेत्यांसमोर आत्मसर्पण केले होते. भारतीय धर्मनिरपेक्षतावाद इस्लामच्या समर्थनाशिवाय अपूर्ण आहे. एक ऑक्टोबरला धर्मनिरपेक्ष लेखिका शोभा डे यांनी ट्विट केले : 'मी गोमांस खाल्ले, या मला ठार मारा'. प्रश्न आहे की काय त्या गेट वे ऑफ इंडियावर पैगंबर महमद यांचे कार्टून काढतील? चार ऑक्टोबरला एका धर्मनिरपेक्ष पत्रकाराने भारतीयांना ट्विटरवर 'मी गोमांस खातो' या हॅशटॅगसह ट्विट करण्याचे आवाहन केले. प्रश्न आहे की, धर्मनिरपेक्ष पत्रकार जामा मशिदीसमोर कार्टून बनवतील? संताप गोमांस अथवा कार्टूनविषयी नाही तर भारतीय युवकांना धर्मनिरपेक्षतेच्या दुहेरी मापदंडाविषयी चिंता वाटते आहे. जर आपण आपल्या स्वयंपाकघरापासून कार्टून बनवण्यास इच्छुक असाल तर ते आपल्या गोमांस खाण्याच्या अधिकाराचेही समर्थन करतील. एका दूरसंचार कंपनीसोबत मिळून एका धर्मनिरपेक्ष टीव्ही चॅनलने वाघ वाचवा अभियान सुरू केले. मात्र, गाय वाचवा अभियान का नाही?

भारताची वास्तविकता ही आहे : आमिर खानने पीके चित्रपट बनवला ज्यात स्नानगृहात बंद भगवान शिवाला धमकावले जाते. परंतु ते पैगंबर महमद

यांच्यावर चित्रपट बनवू शकत नाहीत. आपल्या राष्ट्रीय चर्चेत हेच असंतुलन आहे. याला पत्रकारही प्रोत्साहन देतात. भारत तमाम प्रसारमाध्यमांच्या कक्षातील वाढत्या हुकुमशाहीला तोंड देत आहे. भारतातील पत्रकार आपल्या दुटप्पी धोरणामुळे कधी न्यूयॉर्क तर कधी दादरीत भारतीयांकडूनच मार खातात. सोशल माध्यमांत त्यांना दलाल, प्रेस्टिट्यूट अथवा धंदेवाईक माध्यम म्हटले जात आहे कारण ते एक बंगला अथवा अन्य कोणत्याही लाभासाठी आपला आत्मा विकत आहेत. ही धर्मनिरपेक्ष हुकुमशाही प्रवृत्ती आमच्यात फुट पाडून जिंकते. या सर्वांत हे गरजेचे आहे की, कोणी कायदा हातात घेतल्यास पोलिसांनी कठोरपणे हे प्रकरण हाताळायला हवे.

### सेक्युलर बुद्धिमंतांचा जातियवाद

सप्टेंबरच्या शेवटच्या आठवड्यात राष्ट्रीय राजधानी दिल्लीपासून अगदी जवळ असलेल्या दादरी या गावी महंमद अखलाक याला संतप्त जमावाने ठेचून मारले. त्याने गाईची हत्या करून तिचे मांस खाल्याचा आरोप होता. त्यातून हा प्रकार घडला. १९७० आणि १९८० च्या दशकात बिहारमध्ये गोवध बंदी होती. तिथे भारतीय जनता पार्टी नव्हती पण तरीही गोमांसावरून संघर्ष होत असत. त्यावरून पोलिस घरांच्या झडत्या घेत असत. गोमांसावरून होणारे संघर्ष भारतासाठी नवे नाहीत. इस्लामी देशात गायींची हत्या केली जात नाही. पण भारतात आणि भारतीय उपखंडात इस्लामने गायींची कत्तल करण्याची प्रथा रूढ केली आहे. हिंदू गायीची पूजा करतात म्हणून त्यांना डिवचण्यासाठी हे केले गेले आहे. पाकिस्तानातल्या फक्र-ए-नाऊ या नव्याने प्रकाशित झालेल्या उर्दू साप्ताहिकाने गोवधाच्या पार्श्वभूमीवर बराच प्रकाश टाकला आहे. आपणही या संबंधात इतिहासात डोकावू शकतो. सोळाव्या शतकात अकबर सत्तेवर असताना (आणि रा. स्व. संघ, भाजपा अस्तित्वातही नसताना) त्याच्या राज्यात गायी कापण्यास बंदी होती. पण तेव्हाच्या शेख अहंमद सरहिंदी या इस्लामी विद्वानाला ही बंदी मान्य नव्हती. 'देशावर मुस्लिम शासकांचे राज्य असताना मुस्लिमांना गोमांस खाण्यास बंदी का?' असा त्याचा सवाल होता. अकबर बहुसंख्य हिंदूच्या संवेदनांविषयी जागरूक होता पण सरहिंदीसारखे विद्वान आजच्या काळातल्या काही विद्वांनाप्रमाणे हिंदूंच्या श्रद्धांविषयी संवेदनशील नव्हते. फक्र-ए-नाऊ हे साप्ताहिक याची चर्चा करताना म्हणतं, 'आज आपण ज्या प्रदेशाला पाकिस्तान म्हणतो त्या प्रदेशात ही गायीची कत्तल करण्याची प्रथा नव्हती. १९४७ साली झालेल्या फाळणीनंतर जे भारतीय मुस्लिम पाकिस्तानात आले त्यांनी ही कुप्रथा आपल्या सोबत पाकिस्तानात आणली.

दादरी येथील घटनेची आज मोठी चर्चा होत आहे. पण ती चर्चा धार्मिक नाही. सध्या भारत देश जगातली महाशक्ती होण्याच्या स्थितीत आला आहे. घटनांच्या या वळणावर अगदी उजव्या विचारांचे विचारवंतही दादरी घटनेकडे जातीय किंवा धार्मिक दृष्टीकोनातून पहात नाहीत तर कायद्याच्या दृष्टीकोनातून पहात आहेत. देशाने केलेल्या गोवध बंदीचा कायदा मोडणाऱ्यांना विनाविलंब अटक करून शिक्षा झाली पाहिजे अशी त्यांची मागणी आहे.

भाजपा खासदार तरुण विजय यांनी २ ऑक्टोबरला लिहिलेल्या लेखात ही भावना व्यक्त केली आहे. दादरी घटना उत्तर प्रदेशातल्या अखिलेश यादव यांच्या सरकारने घटनेने दिलेल्या कायद्याच्या मार्गाने हाताळावे असे आवाहन तरुण विजय यांनी केले आहे. त्यासाठी पूर्णपणे सेक्युलर दृष्टीकोनच गरजेचा असल्याचे तरुण विजय यांचे म्हणणे आहे. कायदा हातात घेणाऱ्यांशी अखिलेश सरकारने कठोरतेने वागावे असे तरुण विजय म्हणतात. पण स्वतःला पुरोगामी, उदारमतवादी विचारवंत मानणारे बुद्धीवंत मात्र दादरी घटनेकडे उलट जातियवादी राजकारणाच्या दृष्टीकोनातून पहात आहेत. नामवंत स्तंभलेखिका शोभा डे यांनी तर 'मी आत्ताच गो-मांस खाल्ले आहे, या आणि माझा खून करा' असे

आव्हानच दिले आहे. अशा प्रकारे गोमांस खाणे हा कायद्याचा भंग आहे, अशा दृष्टीने शोभा डे या घटनेकडे पहायला तयार नाहीत. त्यांच्यासाठी हा हिंदूंच्या भावना जाणीवपूर्वक डिवचण्याचा विषय आहे. त्या गोमांसाचा विषय जातियवादी राजकारणाचा विषय करीत आहेत.

दादरी येथे घडलेल्या हत्येच्या घटनेत जमावातले जे लोक गुंतले असतील त्यांच्यावर अखिलेश यादव यांच्या सरकारने कायद्यानुसार योग्य असेल ती कारवाई करावी असे आवाहन सर्वांनीच करायला हवे. पण, प्रताप भानू मेहता यांच्यासारखे पुरोगामी - डावे विचारवंतही तसे आवाहन करीत नाहीत. उलट कायदेशीर कारवाईचा आग्रह धरणाऱ्या तरुण विजय यांच्यावरच तोफा डागत आहेत. या घटनेत सनातनी मंडळी आणि प्रगतिशील पुरोगामी विचारवंत यांच्या विचारातली एक तफावत दिसत आहे. सनातनी हा प्रश्न आहे तसा वास्तववादी दृष्टीकोनातून पहात आहेत तर डावे बुद्धीवादी त्याकडे आपल्या खास डाव्या दृष्टीकोनातून पहात असून तो आपल्याला जसा हवा तसा रंगवत आहेत. सनातन्यांची या प्रश्नाकडे पाहण्याची दृष्टी प्रामाणिकपणाची आहे तर डाव्यांची दृष्टी अप्रामाणिकपणाची तसेच समाजात दुही निर्माण करणारी आहे. १९८० च्या दशकात राजीव गांधी यांनी शहाबानो प्रकरणात मुस्लिम धर्मगुरूंसमोर गुडघे टेकले तेव्हा प्रताप भानू मेहता आणि तत्सम पुरोगामी विचारवंतांनी घेतलेली भूमिका त्यांच्या वैचारिक अप्रामाणिकपणाचे दर्शन घडवून गेली होती. अशा लोकांनी शहाबानो प्रकरण, अयोध्येच्या मंदिराचे दरवाजे उघडणे आणि सलमान रश्दीच्या सॅटनिक व्हर्सेस या पुस्तकावर बंदी घालणे या तीन घटनांबाबत जी ढोंगीपणाची भूमिका घेतली तिच्यामुळे भारतीय प्रजासत्ताकाला खरा धक्का बसला होता.

देशातले सेक्युलर शासक आपला सेक्युलॅरिझम दिवसाढवळ्या मुस्लिमांच्या पायाशी ठेवून शरणागती पत्करतात तेव्हा भावना दुखावलेल्या हिंदूंनी निषेधाचा चकार शब्दही काढायचा नाही. उलट त्याकडे मूकपणे पहात रहायचे अशी मेहतांसारख्या विचारवंतांची अपेक्षा असते. पण १९८० च्या दशकातल्या या तीन घटनांनी हा ढोंगीपणा उघडा पडला. त्यामुळे भाजपासारख्या पक्षांना सत्य प्रकाशात आणण्याची संधी मिळाली. २०१२ साली राजस्थानात जयपूर येथे ग्रंथ महोत्सव पार पडला. त्याला सलमान रश्दी यांना निमंत्रित करण्यात आले होते पण रझा अकादमीच्या कार्यकर्त्यांनी सलमान रश्दीला जयपूरला येऊ देणार नाही अशी भूमिका घेतली. ही भूमिका लेखन स्वातंत्र्याच्या विरोधात होती. पण राजस्थानातल्या त्यावेळच्या सेक्युलर काँग्रेसच्या सरकारने सलमान रश्दीच्या स्वातंत्र्याचा झेंडा फडवकत ठेवला नाही तर जात्यंध, तसेच विचार स्वातंत्र्याचा गळा घोटणाऱ्या रझा अकादमीच्या मागणीपुढे गुडघे टेकले. सलमान रश्दी या कार्यक्रमात आले तर त्यांच्यावर हल्ला केला जाईल असा इशारा रझा अकादमीने दिला होता. त्याच्यासमोर काँग्रेसच्या सेक्युलर सरकारने मान तुकवली. खरे तर या सरकारने सलमान रश्दींना संरक्षण द्यायला हवे होते. मेहता यांच्या सेक्युलर भाईबंदांच्या सेक्युलर ढोंगीपणाचा इतिहास तसा फार जुना आहेच. आताचे त्यांचे वर्तनही ती ढोंगी परंपरा पाळतच जारी आहे.

***



*व्यक्तीची वाटचाल तामसिक प्रवृत्तीकडून राजसिक प्रवृत्तीकडे आणि तेथून सात्त्विक प्रवृत्तीकडे झाली पाहिजे.*



देवी लक्ष्मी पायाजवळ असली तर ती झोप उडवत नाही. पण डोक्याजवळ आली की झोप लागू देत नाही. पायाजवळ असणे शब्दाचा अर्थ आहे सेविका असणे. दासी असणे. लक्ष्मी असावीच. पैसा असावाच. पण तो साधन आहे. साध्य नाही.

विद्यावाचपस्पती
**प्रा. स्वानंद गजानन पुंड**
वणी, जि. यवतमाळ.
९८२२६४४६११

# शांती आणि निद्रा

असे म्हणतात की, एका म्यानात दोन तलवारी राहात नाहीत आणि एका जागी दोन नारी शांत राहात नाहीत. सामान्य माताभगिनींबाबत हा विषय लागतो की नाही हा प्रत्येकाचा वेगळा अनुभव ठरेल. पण अनेक स्त्रीलिंगी बाबींच्या विषयात हा नियम बराच लागू पडताना दिसतो. उदा. सत्ता आणि शांती. संपत्ती आणि निद्रा. या दोन गोष्टी एकत्र येतच नाहीत असेच जाणवते. सत्ता आली की शांती जाते. संपत्ती आली की निद्रा साथ सोडते. आता पाहिजे तर दोघीही आहेत. अशा वेळी काय करावे?

शक्य आहे. फक्त थोडा शांत विचार करावा लागेल. पहिला विचार करा की जर लक्ष्मीच्या प्राप्तीनंतर निद्रानाश पावत असेल तर कायमचा निद्रानाश कोणाचा व्हायला हवा? उत्तर आहे भगवान श्री विष्णूंचा. कारण सगळी लक्ष्मी ही त्यांच्याच जवळ असते. ते लक्ष्मीपती आहेत. त्यांची झोप कायमची उडायला हवी. पण तसे घडत नाही. उलट ते

परमशांतीत पहुडलेले असतात. आरामात झोपतात. तेही कुठे? तर चक्क शेषावर.

मला सांगा शेष हा काय बिछाना आहे? अहो शेषनारायण जाऊ द्या. साधा निर्विष साप खोलीत आहे अशी शंका आली तरी आपली झोप छुमंतर होणार. मग प्रत्यक्ष शेषावर झोपतात म्हणजे काय? शेषाचा संबंध आहे भीतीशी. भीती आली तरी निद्रा जाते. लक्ष्मी आली तरी निद्रा जाते आणि मग लक्ष्मीशी संबंधित भीती आली तर काय विचारणार?

मात्र श्रीहरींना या दोन्ही समस्या येत नाहीत. ना निद्रेचा प्रश्न, ना भीतीचा. ना लक्ष्मीच्या जाण्याच्या भीतीचा. असे का होते? तर श्रीहरींचे चित्र शांतपणे पाहा.

भगवान श्रीहरी शांतपणे पहुडलेले असतात आणि देवी लक्ष्मी पायाजवळ बसून पाय चेपत असते. ही रचनाच भगवान श्री विष्णूंच्या अभय निद्रेचे रहस्य आहे.

आपली रचना नेमकी याच्या उलटी असते. आपल्याजवळ पैसा जास्त झाला की आपण तो मजबूत तिजोरीत ठेवतो. तिजोरीला मोठी मोठी कुलुपे लावतो. आणि त्यांच्या किल्ल्या नेमक्या डोक्यापाशी घेऊन झोपतो.

देवी लक्ष्मी पायाजवळ असली तर ती झोप उडवत नाही. पण डोक्याजवळ आली की झोप लागू देत नाही. पायाजवळ असणे शब्दाचा अर्थ आहे सेविका असणे. दासी असणे. लक्ष्मी असावीच. पैसा असावाच. पण तो साधन आहे. साध्य नाही. पायाजवळ असण्यात साधनत्व अधोरेखित आहे तर डोक्याजवळ, डोक्यात जाणे आहे आणि डोक्यात गेली की ती निद्रा घालवते हे निश्चित. लक्ष्मी असतानाही शांत झोपायचे असेल तर नारायणांना धरावे. ते शिकवतात शांत कसे राहायचे. लक्ष्मी त्यांच्या पायाशी स्थिरावते आणि शांती आपल्या डोक्यात.

***




# धननाश नको

स्वत:च्या चैनीसाठीच खर्च करतात. आपल्या जवळचा एकही पैसा दुसऱ्यांच्या उपयोगाला येणार नाही याबाबत ते कमालीचे दक्ष असतात. खरं म्हणजे पैसे खर्च करून सुखोपभोग प्राप्त करून घेण्याला एक प्रकारची मर्यादा असते. कारण अशा उपभोगातून मिळणारं समाधान आणि सुख हे क्षणभंगूर असतं, तात्कालिक असतं. उलट इतर माणसांच्या गरजा भागवण्यातून मिळणारा आनंद हा चिरस्थायी स्वरुपाचा असतो.

अरविंद जोशी
९३७०४०८९२६

*दानं भोगो नाशस्तिस्त्रो गतयो भवन्ति वित्तस्य ।*
*यो न ददाति न भूङ्क्ते तस्य तृतीया गतिर्भवति।। ४३ ।।*

वामनपंडितांनी या श्लोकाचा केलेला समश्लोकी अनुवाद असा आहे

*द्रव्यास हे गमतमार्ग यथावकाश।*
*कीं दान भोग अथवा तिसरा विनाश।।*
*जो येथ दान आणि भोग करी न देही।*
*त्याच्या धनासि मग केवल नाश पाहीं।। ४३ ।।*

पैसा म्हणजे नेमकं काय, याचंच भान माणसाला रहात नाही. पैसा म्हणजे वस्तू नव्हे. नुसता पैसा जवळ असला म्हणजे माणसाला सुख मिळत नाही. पैसा हे विनिमयाचं साधन असतं. पैसा खर्च करून सुखसाधनं विकत घेतली जातात, किंवा अन्य प्रकारे पैशाच्या मोबदल्यात प्राप्त केली जात असतात. माणसाला वाहनामुळं सुख मिळतं. माणसाला चांगल्या खाण्या-पिण्यानं सुख मिळतं. माणसाला चांगले कपडे परिधान केल्यानं आनंद मिळतो. या सगळ्या गोष्टी पैशानंच मिळत असतात. परंतु हाती असलेल्या पैशातून या गोष्टी विकत घेतल्या तरच हे सुख, हा आनंद आणि हे समाधान मिळू शकतं. याचा अर्थ असा की, खिशात पैसा आहे म्हणून माणूस सुखी होत नसतो, तर त्या पैशाचा तो विनियोग करतो तेव्हा त्याला आनंद मिळत असतो. म्हणजेच खर्च होणं किंवा व्यय होणं हा पैशाचा मार्ग आहे. अशा रितीनं पैशाला दोन मार्ग असतात. पहिला मार्ग म्हणजे संचय करणं आणि दुसरा मार्ग

म्हणजे खर्च करणं. माणूस पैसा कसा खर्च करतो हे त्याच्या स्वभावावर आणि प्रकृतीवर अवलंबून असतं. काही लोक आपल्याजवळचा पैसा दानधर्म करण्यासाठी खर्चत असतात. त्यातून त्यांना अनेकांचे आशीर्वाद लाभतात. दानधर्म करणारे लोक पैशातून स्वत:चं समाधान आणि इतरांचा आनंद वृद्धिंगत करीत असतात. काही लोक मात्र स्वत:च्या पलीकडं काही पहातच नाहीत. ते आपल्या जवळचा पैसा केवळ स्वत:च्या आनंदासाठी आणि स्वत:च्या चैनीसाठीच खर्च करतात. आपल्या जवळचा एकही पैसा दुसऱ्यांच्या उपयोगाला येणार नाही याबाबत ते कमालीचे दक्ष असतात. खरं म्हणजे पैसे खर्च करून सुखोपभोग प्राप्त करून घेण्याला एक प्रकारची मर्यादा असते. कारण अशा उपभोगातून मिळणारं समाधान आणि सुख हे क्षणभंगूर असतं, तात्कालिक असतं. उलट इतर माणसांच्या गरजा भागवण्यातून मिळणारा आनंद हा चिरस्थायी स्वरुपाचा असतो. त्यामुळं केवळ स्वत:वर पैसा खर्च करण्यापेक्षा इतरांना आनंद देण्यासाठी पैसा खर्च करणं यातून मिळणारा आनंद हा अधिक शाश्वत स्वरुपाचा असतो. म्हणून पैशाचा व्यय करताना तो परोपकाराच्या भावनेतून करावा. परंतु काही लोक कोणत्याही मार्गानं पैसाच खर्च करीत नाहीत. केवळ तो साठवून ठेवतात. त्यामुळं पैशाचा त्यांनाही उपयोग होत नाही आणि ते दुसऱ्यांनाही त्याचा उपयोग होऊ देत नाहीत. अशा लोकांच्या या संचय वृत्तीचा एकच परिणाम असतो तो म्हणजे धनाचा नाश. म्हणूनच भर्तृहरीनं म्हटलं आहे, धनाचे दोन मार्ग आहेत. एक म्हणजे खर्च करणं आणि दुसरा म्हणजे साठवून ठेवणं. मात्र साठवून ठेवण्याचा मार्ग अवलंबिला तर धनाची तिसरी अवस्था म्हणजे धनाचा नाश ही आपोआपच साधली जाते. म्हणून पैसा साचवून ठेवणं योग्य नव्हे. आपल्याकडं असलेला पैसा केवळ दानासाठीच खर्च करावा किंवा स्वत:च्या उपभोगासाठीच खर्च करावा असंही काही नाही. कारण शेवटी उपभोगाच्या इच्छेची तृप्ती कधीच होत नसते. माणसाच्या बहुतेक इच्छांचा होम सतत पेटलेला असतो. त्यामध्ये एकेका इच्छापूर्तीची आहुती टाकत गेलो तर इच्छांचा अग्नी शांत तर होतच नाही, पण तो वरचेवर भडकत मात्र जातो. धनाची आकांक्षा ही फार वाईट असते. एखाद्या माणसाला कितीही धन दिलं तरी तो पुरे असं कधी म्हणत नाही. त्यामुळं कोणालाही धनाचं दान देण्यापेक्षा अन्नाचं दान द्यावं असे म्हणतात. कारण जेवण करणारा माणूस पोट भरल्यानंतर का होईना पण, पुरे असे म्हणतो. मात्र असे दानधर्म करण्याशिवाय धनाचा व्यय करण्याचे आजच्या काळाशी सुसंगत असे इतरही काही मार्ग आहेत. त्यामध्ये आपल्या जवळचा पैसा स्वत:साठीच खर्च करण्यापेक्षा किंवा नुसताच साठवून ठेवण्यापेक्षा त्याचा उत्पादक वापर करणं हेही सोयीस्कर ठरत असतं. कारण त्यातून उत्पादन वाढतं आणि कष्ट करण्याची इच्छा असणाऱ्या माणसाला रोजगार मिळतो, हाती कौशल्य असणाऱ्या माणसाला कौशल्याचा आविष्कार घडविण्याची संधी मिळते आणि समाजाची श्रीमंती वाढत जाते. म्हणूनच भर्तृहरीच्या या श्लोकातला, धननाश होऊ न देण्याचा हा संदेश आपण आजच्या काळाला अनुसरून असा घेऊ शकतो की, धन पडून ठेवण्यापेक्षा किंवा नुसतंच साठवण्यापेक्षा ते उत्पादक कामासाठी वापरलं पाहिजे. एकंदरीत नाश ही त्याची गती टाळली पाहिजे.



***

*ज्ञान मिळविण्याइतकेच ते इतरांना देणेही महत्त्वाचे. ज्ञान दिल्याने वाढते - कमी होत नाही.*






## सुबोध वेल : ५

**सूचना** : या वेलीवर आहे स्वामी विवेकानंदांचा सुविचार. क्रमांकानुसार समानार्थी शब्द लिहा. सुविचार वाचा. आचरणात आणा व आनंद मिळवा.

**सुरेखा काणे,** संभाजीनगर. फोन : ०२४०-२३२८२१७

| क्र. | | सूचक शब्द |
|---|---|---|
| १ | | १ आईची आई |
| २ | | २ opportunity |
| ३ | | ३ विद्युत |
| ४ | | ४ भावाचा मुलगा |
| ५ | | ५ सूर्य,××वार. |
| ६ | | ६ मुद्दल+××= रास |
| ७न्म | | ७ न्म |
| ८ | | ८ पाहणारे |
| ९ | | ९ ६० मिनिट =एक×× |
| १० | | १० बाहेर विरूध्द |
| ११ | | ११ पृथ्वी.×× पाल |
| १२ | | १२ अग्नि,विस्तव |
| १३ | | १३ विष्णुचा आठवा अवतार |
| १४ | | १४ वेग. |
| १५ | | १५ अंक, |
| १६ | | १६ आकाश,मेघ |
| १७ | | १७ नवरी |
| १८ | | १८ आश्चर्योद्‍गार |
| १९ | | १९ ४×२+५=×× |

**कोड्याचे उत्तर याच अंकात इतरत्र**

## मी कोण?



लोक मला मेट्रो मॅन म्हणून ओळखतात. मी एक प्रसिद्ध स्थापत्य अभियंता आहे. केरळमधील पलक्काड येथे माझा जन्म झाला. १९६३ मध्ये रामेश्वर व तमिळनाडूला जोडणारे पंबन पुल तुटले. त्याच्या पुनर्निर्माणासाठी वरिष्ठ अधिकाऱ्यांनी सहा महिन्यांचा कालावधी निश्चित केला. मात्र, त्या भागाच्या अधिकाऱ्याने त्यासाठी तीन महिन्याचा कालावधी निश्चित करुन त्याची जबाबदारी माझ्यावर सोपवली. मात्र, मी हे काम ४५ दिवसांत पूर्ण केले. आधुनिक रेल्वे सेवा कोकण रेल्वे, देशातील पहिली मेट्रो सेवा कोलकाता मेट्रो व दिल्ली मेट्रोची योजना व कार्यप्रणाली माझीच होती. सरकारने पद्मश्री व पद्मविभूषण देऊन माझा सन्मान केला. नियोजनबद्धरीत्या निश्चित वेळेत काम पूर्ण करणे हे माझ्या कार्यशैलीचे वैशिष्ट्य आहे. टाईम पत्रिकेनेही माझी दखल घेतली होती. जपानचा राष्ट्रीय सन्मान - ऑर्डर ऑफ द रायजिंग सन - गोल्ड एंड सिल्वर स्टारनेही मला सन्मानित करण्यात आले.



*आनंदाने, प्रसन्नपणाने समोरच्या अन्नाचा आस्वाद घ्या. तुम्ही योग्यांहूनही योगी व्हाल.*

## ओळखा पाहू : मागील अंकाची उत्तरे



**संगोळी रायण्णा** *(१५ ऑगस्ट १७९८ - २६ जानेवारी १८३१)*

स्वातंत्र्यपूर्व कित्तूर संस्थानचे सेनापती आणि भारतीय स्वातंत्र्य सेनानी होते. आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत त्यांनी ब्रिटीशांशी निकराची झुंज दिली. कित्तूर संस्थानची राणी चेन्नम्मा यांनी राजा मल्लसर्जा यांच्या निधनानंतर शिवलिंगप्पा याला दत्तक घेतले. ब्रिटीश ईस्ट इंडिया कंपनीने दत्तकविधान नामंजूर करत राणीची सिंहासनावरुन हाकालपट्टी केली. स्वाभिमानी राणी चेन्नम्माने ब्रिटीशांविरुद्ध युद्ध पुकारले. या युद्धात संगोळी रायण्णा सेनापती होता. त्याने पराक्रमाची शर्थ केली. परंतु दुर्दैवाने राणीला पकडून कैदेत ठेवण्यात आले. तेथेच तिचा मृत्यू झाला. त्यानंतरही रायण्णाने सैन्य उभे करुन ब्रिटीशांशी चांगलीच झुंज दिली. त्याने सामान्य जनतेस उठाव करण्यास प्रोत्साहित केले. परंतु फितुरी व दगा भारतीय समाजावरील कलंक आहेत. अखेर दगा करुनच ब्रिटीशांनी रायण्णाला पकडले. त्यांना नंदगड (जि. बेळगाव) येथे फाशी देण्यात आले. तेथे त्यांची समाधी आहे. त्यांच्या स्मृती जपण्यासाठी कर्नाटकातील हुबळी येथे १३ फुटी ब्राँझचा पुतळा उभारण्यात आला आहे.



**लाला लजपतराय** *(२८ जानेवारी १८६५ - १७ नोव्हेंबर १९२८)* भारतातील एक प्रमुख स्वातंत्र्य सेनानी होते. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसमधील जहाल गटातील तीन प्रमुख नेते लाल - बाल - पाल यापैकी एक नेते होते. त्यांना पंजाब केसरी म्हणून ओळखले जाते. ते आर्य समाज व हिंदू महासभेशीही जोडले गेले होते. स्वामी दयानंद सरस्वती यांच्यासमवेत त्यांनी पंजाबमध्ये आर्य समाजाचा प्रचार, प्रसार केला. १९२८ मध्ये त्यांनी सायमन कमिशनविरुद्धच्या आंदोलनात सहभाग घेतला. यावेळी झालेल्या लाठीहल्ल्यात गंभीर जखमी झाल्याने त्यांचा मृत्यू झाला. दरम्यान, लाला लजपतराय यांनी हिंदीमध्ये शिवाजी, श्रीकृष्ण आदि अनेक महापुरुषांचे जीवनचरित्र लिहिले. देशात विशेषत: पंजाबमध्ये हिंदीच्या प्रचार, प्रसारात त्यांचे मोठे योगदान राहिले आहे. देशभरात हिंदी भाषा लागू होण्यासाठी त्यांनी स्वाक्षरी अभियानही राबवले होते. तसेच पंजाब नॅशनल बँक व लक्ष्मी विमा कंपनीची स्थापना केली. लाला हंसराज यांच्यासमवेत दयानंद वैदिक शाळा, महाविद्यालयांच्या उभारणीतही त्यांचे योगदान होते.

## ओळखा पाहू



(अ)



(ब)

*बालमित्रांनो, आधुनिक भारताच्या जडणघडणीत मोलाचे योगदान देणारी दोन व्यक्तिमत्त्वे ओळखा. यासाठी मित्र, शिक्षक, घरातील वडिलधाऱ्यांची मदत घ्या. आणि यांच्याविषयी प्रत्येकी ५० ते ६० शब्दांत माहिती लिहून पाठवा. ती या सदरात प्रसिद्ध करू.*

*भव्य स्वप्ने नुसती पाहून भागत नाहीत. तर त्यांच्या पूर्तीसाठी तितकेच भव्य परिश्रमही घ्यावे लागतात !*

## गोष्टी विवेकानंदांनी सांगितलेल्या



# सम्राट व साधू

एकदा एक सम्राट शिकारीसाठी अरण्यात गेला. त्या अरण्यात एक साधू तपश्चर्या करीत असलेला त्याने पाहिला. त्या साधूचे तेजस्वी मुखमंडल पाहून तो राजा प्रभावित झाला. त्याला



दरबारात घेऊन यावे, त्याचा आदरसत्कार करावा, त्यास काही दान द्यावे अशी त्याला इच्छा झाली. राजाने साधूपुढे आपली इच्छा व्यक्त केली. साधूने प्रथम नकार दिला. पण थोडा विचार करून त्याने राजेच्छेस मान्यता दिली. राजा व साधू राजदरबारात आले. अत्यंत आदराने राजाने साधूस आसन ग्रहण करण्यास सांगितले व राजा म्हणाला, ''मुनिवर्य, थोडा काळ आपण बसावे. मी ईश्वराची प्रार्थना करतो मग आपला आदरसत्कार करतो व आपणास दान देतो.'' साधू अस्वस्थ झाला. राजा प्रार्थना करुन म्हणाला, ''हे ईश्वरा ! मला राज्य दे ! संतती दे ! संपत्ती दे !'' प्रार्थना संपली आणि राजाने साधूकडे पाहिले. साधू आसन सोडून बाहेर जाण्यास निघाले होते. राजा लगबगीने पुढे झाला व साधूस थांबवून त्याने विचारले, ''साधू महाराज, आपण माझ्याकडून दान न घेताच निघालात?'' साधू म्हणाला, ''राजन्, मी तुला सम्राट समजत होतो. पण तुझी प्रार्थना ऐकून माझा भ्रमनिरास झाला. तू परमेश्वराजवळ राज्य दे, संतती दे, संपत्ती दे अशी भीक मागत होतास. तू सम्राट नाहीस, भिकारी आहेस. मी भिकाऱ्याकडून दान घेत नाही. तू एक भिकारी, तू काय मला दान देणार आहेस ? जा, प्रथम तू तुझ्या इच्छा पुऱ्या करुन घे.'' असे म्हणून साधू निघून गेला.

# डाळीचं पत्र

चंदनपूर नावाचे एक सुंदर गाव होते. सुपीक जमीन, भरपूर झाडे, स्वच्छ हवा. निसर्गाचे जणू गावाला वरदान होते. गावतील लोकही एकोप्याने रहायचे. याच गावात महादेव नावाचा एक मेहनती, जिद्दी, श्रीमंत शेतकरी रहायचा. तो दिवस-रात्र मेहनत करायचा. त्याची बायको जानकी ही सुद्धा महादेवला मदत करायची. पण त्या दोघांना काळजी होती ती त्यांच्या मुलाच्या भवितव्याची.

१४ वर्षाचा भरत फारच हट्टी व आळशी होता. आई-वडिलांना देखील तो कधीही मदत करायचा नाही. त्याला पानात अन्न टाकायची खूप वाईट सवय जडली होती. आई-वडिलांनी खूपदा सांगूनही भरत ऐकायचा नाही. तो फारच हट्टीपणे वागायचा. महादेव-जानकी यांनी भरतला चांगलाच धडा शिकवायचा ठरवले. ठरल्याप्रमाणे दोघेही चार दिवसांकरीता परगावी निघून गेले. आता आई-वडिलांची कटकट नाही या विचाराने भरत खूष झाला होता. भरतने बराच वेळ निवांत झोप काढली. मात्र त्यानंतर भुकेच्या जाणिवेने भरतला काही सुचेनासे झाले. त्याच्या पोटात भुकेचे कावळे ओरडायला लागले. तो स्वयंपाक खोलीत गेला. पण यावेळी आई जेवण बनवून गेलेली नव्हती. मग त्याने खाऊच्या डब्यांची चाचपणी सुरू केली. पण सगळे डबे रिकामेच होते. भरत आता फारच वैतागला होता. शेजारच्या काकू जेवण देणार असतील बहुदा, असा विचार करून तो स्वस्थ बसला. पण आई-बाबांच्या योजनेत शेजारचे सुद्धा सामील होते. त्यामुळे त्यांनीही भरतला जेवणाबाबत काही विचारपूस केली नाही. त्यामुळे आता मात्र भरतला शांत बसवेना. त्याने डाळ-तांदुळाचे डबे उघडले आणि तो अवाक् झाला. प्रत्येक डब्यात त्याला एक पत्र सापडले, जे स्वतः डाळ, तांदुळाने भरतसाठी लिहिले होते.





प्रिय भरत,

मी डाळ बोलतेय. तुला नवल वाटेल मी कशी काय बोलू शकते. खूप दिवसांपासून तुझ्याशी बोलायची इच्छा होती. रागावू नको भरत, पण तू जितक्या सहजपणे आम्हाला फेकून देतोस, तितक्या सहजरित्या आम्ही घरात येत नाही. तुझे आई-बाबा व प्रत्येक शेतकरी प्रचंड मेहनत करतात. घाम गाळतात तेव्हा आम्ही तयार होतो. त्यानंतर तुझी आई, प्रत्येक घरातली आई खूप प्रेमाने, कष्टाने आमच्यापासून विविध पदार्थ बनवते. तू स्वतः एक दिवस शेतात काम करून बघ. स्वतः एक दिवस जेवण बनवून बघ. तेव्हाच तुला प्रत्येक आईचे व शेतकऱ्यांचे कष्ट समजतील.

तुझीच
डाळ

अशाच प्रकारे प्रत्येक डब्यात धान्यांनी आपली पत्रं लिहिली होती. हा सर्व प्रकार पाहून भरत चक्रावला. पण खूप भूक लागल्याने त्याने स्वतःच स्वयंपाक बनवण्याचे ठरवले. अर्धे कच्चे, करपलेले, बेचव असे जेवण त्याने बनवले होते. नेहमीच्या सवयीप्रमाणे आज त्याला अन्न टाकून देणं चालणार नव्हते. कारण भूक तर लागली होती. पटापट खाऊन दमलेला भरत झोपण्यासाठी आडवा झाला. पण त्याच्या डोळ्यासमोरून डाळीचे पत्र काही केल्या जात नव्हते. त्यामुळे तो उठला आणि शेतात जाऊन तो काम करू लागला. त्याने काही वेळ कामही केले. पण त्याला श्रमाची सवय नसल्यामुळे तो थकून गेला. आई-बाबा रोज खूप मेहनत करतात. ते किती थकत असतील असा विचार त्याच्या मनात आला.

त्यानंतर पुढचे तीन दिवस भरत स्वतःच जेवण बनवत होता आणि शेतात कामही करत होता. या चार दिवसात तो खूप थकला, कंटाळला, चुकला, धडपडला पण त्याने मनापासून प्रयत्न केले. या दिवसात भरत खूप काही शिकला. त्याला त्याच्या चुकांची जाणीव झाली. जेव्हा आई-बाबा आले तेव्हा भरतने त्यांच्यासाठी खिचडी बनवून ठेवली होती. आता तो कायमच आई-बाबांना कामात मदत करू लागला. तो जे अन्न टाकून देत असे त्याचे महत्त्व त्याला समजले होते. यापुढे आपण कधीही अन्न वाया घालवायचे नाही याची जणू त्याने प्रतिज्ञाच केली. आजही तो ते पाळतो आहे.

**ज्योती महाजन, दापोली**

*मनातील स्पष्ट कल्पना आणि त्या मूर्त स्वरुपात आणण्याची जबरदस्त इच्छाशक्ती ज्याच्याजवळ असते त्यालाच 'प्रतिभावान' म्हटले जाते.*




PM's address at "Samvad"- Global Hindu-Buddhist Initiative

## जागतिक हिंदू - बौद्ध संमेलन

# गेल्या २५०० वर्षांत झालेला पहिलाच ऐतिहासिक प्रयोग

**या संमेलनाच्या आयोजनामागे दोन शक्तिशाली देशांच्या (भारत आणि जपान) पंतप्रधानांची दूरदृष्टी होती. वर्षभरापूर्वी जपानचे पंतप्रधान आबे शिंझो आणि भारताचे पंतप्रधान श्री. नरेंद्र मोदी यांच्यात झालेल्या चर्चेचे फलित म्हणजे हे संमेलन होते.**

**सिद्धाराम भै. पाटील**
*संपादक, विवेक विचार*
*सोलापूर. ८८०६५५५५८८*

परराष्ट्र, संरक्षण, संस्कृती आणि शेजारी देश या विषयांवर राष्ट्रीय भूमिकेतून मूलभूत व सखोल संशोधन आणि विश्वस्तरावर संवादातून शांतता हे ब्रीद घेऊन कार्य करणारी भारतातील संस्था म्हणजे विवेकानंद इंटरनॅशनल फाउंडेशन (व्हीआयएफ). नवी दिल्ली येथील चाणक्यपुरी म्हणजे विविध देशांच्या दूतावासाची कार्यालये असलेला भाग. याच भागात सन मार्टिन मार्गावर विवेकानंद केंद्र कन्याकुमारीचा एक प्रकल्प असलेल्या विवेकानंद इंटरनॅशनल फाउंडेशनचे कार्यालय आहे. नरसिंह राव सरकारच्या काळात १९९३ मध्ये केंद्राला ही जागा देण्यात आली. आणि त्यानंतर २००९ मध्ये व्हीआयएफची स्थापना झाली. सुरुवातीच्या वर्षांमध्ये भारतीय गुप्तचर विभागाचे माजी प्रमुख आणि मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध असलेल्या अजित डोभाल यांनी या संस्थेचे नेतृत्व केले. अल्पावधीतच आधुनिक भारताची थिंक टँक म्हणून या संस्थेची देशविदेशात ओळख निर्माण झाली. भारतीय स्थलसेनेचे माजी प्रमुख जनरल एन. सी. विज हे सध्या या संस्थेचे संचालक आहेत. व्हीआयएफच्या देखण्या सभागृहात ३ आणि ४ सप्टेंबर रोजी जागतिक

हिंदू - बौद्ध संमेलन पार पडले. विवेकानंद इंटरनॅशनल फाउंडेशन, जपानची थिंक टँक समजली जाणारी टोकियो फाउंडेशन आणि जगभरातील बौद्धांची सर्वोच्च संस्था इंटरनॅशनल बुद्धीस्ट कॉन्फिडरेशन या जागतिक स्तरावर नावलौकिक असलेल्या तीन संस्थांनी मिळून या संमेलनाचे आयोजन केले होते.

या संमेलनाचे बीज ११ सप्टेंबर १८९३ रोजी स्वामी विवेकानंदांनी शिकागो सर्वधर्मपरिषदेत केलेल्या ऐतिहासिक भाषणात आहे. माझा धर्म सत्य आहे, तसे इतरांचे धर्मही सत्य आहेत' हा सहिष्णू विचार हजारो वर्षांपासून जगत आलेल्या हिंदू धर्माचा मी प्रतिनिधी आहे, अशी भूमिका स्वामीजींनी मांडली होती. माझाच धर्म खरा, इतरांचे धर्म खोटे' असा अट्टाहास धरणाऱ्या एकांतिक धर्मियांमुळे ही पृथ्वी अनेकदा नररक्ताने न्हाऊन निघाली आहे. आगामी काळात जगात शांती नांदायची असेल तर इतर धर्मांचे अस्तित्व मान्य करावेच लागेल. हा विचार वेदांतामध्ये आहे. केवळ माझाच धर्म खरा म्हणणाऱ्या धर्मांचा अनुभव घेतलेल्या जगासाठी हा विचार नवीन आणि आश्वासक होता. हा विश्वबंधूत्वाचा विचार आजही एकांतिक धर्मीयांनी स्वीकारलेला नाही. त्यामुळेच इस्लामी स्टेटसारखे गट रक्ताला चटावलेले आहेत. मिशनऱ्यांच्या टोळ्या धर्मांतरणे घडवून आणण्यासाठी कोणत्याही थराला चालले आहेत. अशा वेळी जगातील संघर्ष टाळण्यासाठी एका सशक्त पुढाकाराची गरज होती. जागतिक हिंदू - बौद्ध संमेलनाकडे या पार्श्वभूमीवर पाहिले पाहिजे.

ईश्वर हा एकच आहे आणि तो विविध रूपातून प्रकट होतो हा विचार जगाला देणे, हेच भारताचे नियत कार्य आहे, असे स्वामी विवेकानंद म्हणायचे. यासाठी भारताचे ऐक्य म्हणजे येथील आध्यात्मिक शक्तींचे

## हिंदू - बौद्धांकडे आहे, आजवरचे सर्वात श्रेष्ठ तत्त्वज्ञान

सर्वांना एकच नाव असलेल्या ईश्वराचे अनुयायी बनवणे आणि त्यातून शांतता प्रस्थापित करणे हे कदापि शक्य नाही. विविधता हा निसर्गाचा सिद्धांत आहे, असे असताना संपूर्ण मानव जातीत बंधुभाव कसा निर्माण करता येईल याचा विचार हिंदू आणि बौद्ध तत्त्वज्ञानात झाला आहे. विविधतेच्या पलिकडे असलेल्या एकत्त्वाच्या तत्त्वानेच संपूर्ण मानव जातीत बंधुभाव आणणे शक्य आहे. स्वामी विवेकानंद म्हणतात, विविध धर्मांनी माझाच धर्म श्रेष्ठ असल्याचे दावे केलेले मी सातत्याने ऐकत आलेलो आहे. परंतु वेदांत आणि केवळ वेदांत हाच वैश्विक धर्म होऊ शकतो, अन्य कोणताही नाही हे मी तुम्हाला साधार सांगू इच्छितो, आमच्या धर्माव्यतिरिक्त इतर सर्व धर्म हे ऐतिहासिक व्यक्तिंवर केंद्रित आहेत. परंतु आमचा धर्म हा तत्वज्ञानावर आधारलेला आहे. जगातील सर्व मानव कोणत्याही एकाच व्यक्तिच्या प्रभावाखाली आणणे शक्य नाही. जगातील बहुसंख्य मानवसमाज जर कधी एकाच धर्म विचाराने बांधणे शक्य झाले तर ते केवळ तत्त्वज्ञानानेच शक्य होइल, कोणत्याही व्यक्तिविचाराने नाही.'

स्वामी विवेकानंद हे आपल्या एका भाषणात जगाच्या इतिहासाचा धांडोळा घेत सांगतात की, एकत्त्वाचा शोध हा जगातील सर्वच धर्मांचा आणि विज्ञानाचा नेहमीच विषय राहिला आहे. परंतु इतर देशांमध्ये जेव्हा जेव्हा वेगवेगळ्या जमाती एकत्र आल्या तेव्हा तेव्हा इतर जमातीमधील देवांचे अस्तित्त्व पाहून गोंधळून गेल्या. तोपर्यंत केवळ त्यांचाच एकमेव देव सत्य आणि श्रेष्ठ देव आहे, असा त्यांचा समज होता. एकाच जगाचे दोन शासक किंवा निर्माते कसल्याही स्थितीत असणे शक्य नाही. त्यामुळे केवळ एकच श्रेष्ठ आणि सर्व शक्तिमान देव असू शकतो अन्य सर्व भ्रामक वा खोटे देव होत, असा विचार करून प्रत्येक

*केवळ बौद्धिक श्रद्धा माणसांना शेळपट बनविते, तर अंत:करणापासूनची श्रद्धा त्याला निर्भय बनविते !*

ऐक्य झाले पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. भारतात जन्मास आलेले एकत्वाचे तत्त्वज्ञान, सर्व उपासनापद्धतींना सामावून घेणारे सहिष्णू तत्त्वज्ञान जगाला देण्यातूनच जगातील संघर्ष टाळता येणार आहे. यासाठी हिंदू - बौद्ध धर्मीयांनी दिल्लीच्या संमेलनातून पुढाकार घेतल्याचे दिसले.

या संमेलनाच्या आयोजनामागे दोन शक्तिशाली देशांच्या (भारत आणि जपान) पंतप्रधानांची दूरदृष्टी होती. वर्षभरापूर्वी जपानचे पंतप्रधान आबे शिंझो आणि भारताचे पंतप्रधान श्री. नरेंद्र मोदी यांच्यात झालेल्या चर्चे चे फलित म्हणजे हे संमेलन होते. या परिसंवादात जपान, म्यानमार, श्रीलंका, थायलंड, कंबोडिया, मंगोलिया, भुतान, नेपाळ, रशिया, व्हिएतनात आणि तैवान या देशांतील राजकीय नेते, बौद्धांचे सर्वोच्च धर्मगुरू आणि तपस्वी विद्वान सहभागी होते. तसेच भारतातील हिंदू धर्मगुरू आणि विद्वान होते.

परिसंवादाची सुरूवात जपानचे पंतप्रधान आबे सिंझो यांच्या प्रक्षेपित भाषणाने झाली. सन २००७ च्या ऑगस्ट महिन्यात जपानचे पंतप्रधान आबे शिंझो यांनी भारतीय संसदेच्या संयुक्त सभेला संबोधित केले होते. जगात शांतता प्रस्थापित करण्यासाठी आवश्यक विचार केवळ भारत आणि जपान या दोनच देशांकडे आहे. त्यामुळे जगात शांतता प्रस्थापित करण्यासाठी भारत आणि जपानने पुढेल आले पाहिजे, अशी भूमिका मांडली होती. स्वत: आबे शिंझो हे स्वामी विवेकानंदांच्या तत्त्वज्ञानाचे अभ्यासक आहेत. स्वामीजींनी सांगितलेल्या विश्वबंधुत्वाच्या संदेशाच्या आधारावर पुढे जावे लागेल असे श्री. शिंझो यांनी सांगितले. त्यानंतर या परिसंवादाची मुख्य भूमिका भारताचे पंतप्रधान नरेंद्र मोदी यांनी मांडली. दोन पंतप्रधानांनी या ऐतिहासिक परिसंवादाबद्दल

जमात माझाच देव श्रेष्ठ असल्याचा दावा करू लागली. आणि ते सिद्ध करण्यासाठी म्हणजे माझाच देव सर्वशक्तिमान असल्याचे सिध्द करण्यासाठी देवाच्या नावाने युद्धे सुरू झाली. प्रत्येक गट दावा करू लागला की, त्याच्या जमातीचा देव हाच एकमेव सत्य देव होय. स्वामीजी जोर देवून सांगतात, या धर्माच्या वर्चस्वासाठी किती मोठा रक्तपात आणि पशुतेचे वर्तन झाले हे सर्वांनाच ज्ञात आहे. आपण आजही पाहतो आहोत की, माझाच देव श्रेष्ठ, माझीच उपासनापद्धती योग्य या हट्टाग्रहापायी जगात सर्वत्र रक्तपात अद्यापही चालूच आहे. इराक, सिरिया किंवा इस्त्राईलमधील युद्ध असो की मुंबई, पंजाब किंवा अमेरिकेच्या ट्विन टॉवरवरील विमान हल्ला हे सारे याचेच निदर्शक आहेत. एकाच श्रेष्ठ देवाच्या स्थापनेचा शोधमार्ग चुकला आहे. केवळ एकच देव सत्य असल्याच्या दाव्यातून शांतता किंवा बंधुभाव निर्माण करता आलेले नाही, यातून केवळ निष्पाप लोकांचा रक्तपातच होत आला आहे.

भारतातसुद्धा एकाच सर्वश्रेष्ठ ईश्वराचा शोध घेतला गेला पण सुदैवाने केवळ एकच ईश्वर सर्वश्रेष्ठ असा दावा ऋषी-मुनींनी केला नाही. भारत आणि संपूर्ण मानवजातीचे हे सुदैवच म्हटले पाहिजे. ऋषी-मुनींनी अनुभूती घेतली की, ईश्वर हा एकच आहे आणि तो विविध रूपातून व्यक्त होतो. बंधुभाव आणि मानवतेसाठी लावण्यात आलेला हा एक महान शोध होय. स्वामीजींनी याचे वर्णन अतिशय सुंदर शब्दातून केले आहे. ते म्हणतात, सर्व देशांत भारत हाच एकमेव देश असा आहे, की याठिकाणी अध्यात्म, बंधुभाव आणि सहजीवन रूजले. त्यामुळे इथे विविध जाती-जमाती आणि त्यांचे देव यांच्या नावे लढाया झाल्या नाहीत. त्या अत्यंत प्राचीनकाळी सुद्धा येथे ज्ञानी ऋषी-मुनी पुढे आले आणि त्यांनी स्पष्ट केले एकम् सत् विप्रह बहुदा वदंती' तो' एकच आहे फक्त ज्ञानी त्याला विविध नावांनी संबोधतात. या एकाच वाक्यात आजवरचे सर्वात श्रेष्ठ तत्त्वज्ञान, सर्वात श्रेष्ठ शोध सामावलेले आहे. *(विवेकानंद केंद्राच्या उपाध्यक्ष बी. निवेदिता यांच्या चिंतनावर आधारित)*

*अंत:करणात श्रद्धेचे जागरण करुन, निर्भय बनून आपण आपल्या उदात्त आणि पवित्र ध्येयासाठी संघर्षाला सामोरे गेले पाहिजे.*

दाखवलेली आत्मीयता ही गौरवास्पद बाब असल्याचे जगभरातून आलेल्या बौद्ध धर्मातील सर्वोच्च धर्मगुरूंनी बोलून दाखवले. यावेळी व्यासपीठावर श्रीलंकेच्या माजी राष्ट्रपती चंद्रिका कुमारतुंगा, आध्यात्मिक गुरू श्री श्री रविशंकर, बौद्धांच्या सर्वोच्च संस्थेचे अध्यक्ष लामा लॅब्झांग, जनरल विज, टोकिओ फाउंडेशनचे संचालक मसाहिरो अकियामा, सितागु इंटरनॅशनल बुद्धीस्ट अकॅडमीचे संस्थापक कुलगुरू डॉ. न्यानीसारा, भारताचे सांस्कृतिक मंत्री, जपानचे परराष्ट्रमंत्री, भुतानचे अर्थमंत्री, नेपाळचे सांस्कृतिक मंत्री आणि अन्य अनेक देशांचे राजकीय धुरिण, सुधा मूर्ती, आचार्य गोविंददेव गिरी यांच्यासह अनेक मान्यवर उपस्थित होते.




उद्‌घाटनपर भाषणात पंतप्रधान मोदी यांनी बौद्ध आणि हिंदू धर्म हे उपसनापद्धती कमी अन् तत्त्वज्ञान अधिक असल्याचे सांगितले. विचारधारा फूट पाडते तर तत्त्वज्ञान जोडून ठेवते. संवादातूनच जोडणे शक्य होते. सगळी उपनिषदे ही संवादातूनच निर्माण झाली आहेत. पूर्वी सैन्य हे शक्तीचे प्रतीक मानले जात असे. आता शक्ती ही विचारांची शक्ती आणि प्रभावी संवादातून निर्माण होते, हे स्पष्ट झाले आहे. सर्व प्रकारचे संघर्ष दूर करण्याची शक्ती संवादात आहे. मनुष्य आणि निसर्ग, निसर्ग आणि विकास, निसर्ग आणि विज्ञान या प्रकारचे संघर्ष टाळण्याची मूल्ये हिंदू आणि बौद्ध परंपरेत खोलवर रूजलेली आहेत. ही मूल्ये आपल्याला संघर्ष टाळण्यासाठी, शांततेकडे जाण्यासाठी आणि स्वच्छ, सुंदर पर्यावरणासाठी प्रेरक ठरतील, असे ते म्हणाले.

दोन दिवसांच्या परिसंवादानंतर पंतप्रधान नरेंद्र मोदी यांनी बोध गया येथे परिसंवादासाठी जगभरातून आलेल्या सर्व बौद्ध धर्मगुरू, विद्वान, राजकीय नेते यांचे स्वागत केले. बोधगया ही भारत आणि बौद्ध जगतामधील महत्त्वाचा दुवा असल्याचे सांगून बोधगयेला आध्यात्मिक राजधानी म्हणून विकसित करणार असल्याचे त्यांनी सांगितले. गौतम बुद्धांनी उपासनेच्या अनेक पद्धती स्वीकारल्या. त्यांनी केवळ हिंदू तत्त्वज्ञानाचीच फेरमांडणी केली नाही, तर जगाचा दृष्टिकोनही बदलला. जगाला नवा दृष्टिकोन दिला. हिंदू तत्त्वज्ञानातून अनेक आध्यात्मिक तत्त्ववेत्ते निर्माण झाले. त्यात गौतम बुद्ध अग्रस्थानी म्हटले पाहिजेत. देशात अनेक धर्मनिरपेक्ष आणि शाश्वत घटकांना स्थान मिळाले आहे. हेच भारतीय आणि हिंदू तत्त्वज्ञानाचे महान वैशिष्ट्य मानले पाहिजे.'', असे विचार त्यांनी मांडले.

इतर धर्मही सत्य आहेत. त्या मार्गानेही ईश्वरापर्यंत पोहोचता येते', हे तत्त्वज्ञान केवळ भारतीय धर्मांकडेच आहे. हा सहिष्णुतेचा भाव पसरवताना सारी पृथ्वी आपल्याच धर्माचे करण्याच्या धर्मवेडाने पछाडलेल्या गटांविषयी जगातील प्रमुख देशांनी स्पष्ट भूमिका घेतली पाहिजे यासाठी पुढाकार घेणे, हा एक प्रमुख उद्देश या परिसंवादाच्या आयोजनामागे असल्याचे, गेली सहा महिने अथक परिश्रम घेत या आयोजनाला मूर्त रूप देणारी एक प्रमुख व्यक्ती स्वामीनाथन गुरूमूर्ती यांनी सांगितले.

वातावरणातील बदल आणि पृथ्वीवरील ढासळत्या पर्यावरणाच्या पार्श्वभूमीवर जागतिक स्तरावर सजगता आणण्याची गरज आहे. स्वच्छ ऊर्जा, कार्बन उत्सर्जन आदी आव्हानांवर मात करण्यासाठी सरकारी पुढाकारासोबतच सामाजिक आणि धार्मिक परंपरा, तत्त्वज्ञानाचाही आधार घ्यावा लागणार आहे. ही सृष्टी, निसर्ग आपल्या गरजा भागवू शकते, हाव नाही. ही सृष्टी, पृथ्वी म्हणजे आपल्या अस्तित्वाचेच विस्तारित रूप आहे. याची वैज्ञानिक दृष्टीकोनातून केलेली मांडणी, पर्यावरणस्नेही जीवनशैली जगण्याची असंख्य सूत्रे बौद्ध आणि हिंदू ग्रंथांमध्ये विखूरलेली आहेत. त्यांना उजाळा देत पर्यावरणाविषयी जागृती करणे हाही एक मुख्य उद्देश या आयोजनामागे होता. परिसंवादाचा पहिला दिवस जगातील संघर्ष टाळणे तर दुसरा दिवस पर्यावरण सजगतेला वाहिलेला होता.

बौद्ध धर्मीयांची मोठी संख्या असलेल्या जगभरातील सर्वच देशांमध्ये बुद्धाची जन्मभूमी म्हणून भारताविषयी सुप्त श्रद्धाभाव असतो. तोच धागा पकडत या दोन्ही धर्मीयांना एकत्र आणण्याचा हा प्रयोग होता. स्वामी विवेकानंदांनी ११ सप्टेंबर १८९३ रोजी शिकागोच्या सर्वधर्मपरिषदेत दिलेल्या संदेशाचे कृतीशील रूप म्हणून या घटनेकडे पाहिले पाहिजे. म्हणूनच या घटनेकडे ऑर्गनायझेन ऑफ इस्लामिक को ऑपरेशनसारखा एखादा हिंदू - बौद्धांचा एक गट अशा संकुचित दृष्टीकोनातून पाहता येणार नाही. जगाच्या कल्याणासाठी हिंदू आणि बौद्ध धर्मातील सर्वोच्च धर्मगुरू आणि प्रभावी नेत्यांना एका व्यासपीठावर आणणारे हे आयोजन गेल्या २५०० वर्षांत पहिल्यांदाच झाले असावे. दरम्यान, पुढील वर्षी २०१६ मध्ये हे संमेलन जपानमधे घेण्याचे टोकिओ फाउंडेशनने घोषित केले आहे.

## भारताशी पूर्वेचे दृढ नाते

भारतीय संस्कृतीने जगाला दिलेली देणगी म्हणजे गौतम बुद्ध. पण आजवर आपण आग्नेय आणि पूर्वेकडील आशियाई देशांशी संबंध ठेवताना बौद्ध परंपरेकडे दुर्लक्ष




केले. आपल्या पूर्वेकडील सर्व देश हे धार्मिक आणि सांस्कृतिक धाग्याने भारताशी अतिशय दृढपणे बांधले गेले आहेत. या देशांमध्ये हिंदू आणि बौद्ध परंपरा एकरस होऊन नांदताहेत. हाच आधार आपल्याला एकत्र आणू शकतो. त्या दृष्टीने नवी दिल्लीतील परिसंवाद मैलाचा दगड ठरणार आहे. चीनला निमंत्रण देऊनही तो देश अनुपस्थित राहिल्याचे दिसून आले.

## महाराष्ट्रातही शक्य आहे असा प्रयोग

महाराष्ट्रातही परस्परांच्या श्रद्धास्थानांचा आदर राखून हिंदू अन् नवबौद्धांना एकत्र आणण्याचे प्रयत्न झाल्यास येथील समाजजीवनाला ऐतिहासिक कलाटणी मिळू शकते. अर्थातच हे खूप कठीण आहे. दोन्ही बाजूने दोन पावले पुढे पडण्याची आवश्यकता आहे. महाष्ट्रात हिंदू - नवबौद्ध संबंधाला अनेक कांगोरे आहेत. राजकीय समीकरणेही जोडली गेली आहेत. त्यामुळे या साऱ्यापासून दूर राहून दोन्ही समाजातील सकारात्मक विचारांचे, तळमळीचे लोक धाडसाने पुढे आल्यास एक नवी सुरूवात होऊ शकते. पूज्यनीय डॉ. बाबासाहेबांचे शतकोत्तर रौप्य महोत्सवी वर्ष सुरू आहे. या वर्षात ही नवी सुरूवात होईल काय? ***

*अन्न असो किंवा ज्ञान ज्याला ज्याची गरज आहे ते देणे याला सेवा म्हणतात.*




# वाईट लोकांपासून दूरच राहा

नरेंद्र, तुझं काय मत आहे? विषयी लोकांच्या जिभेला तर हाडच नसतं. पण तू पाहिलं नाहीस का की, हत्ती रस्त्याने जाऊ लागला म्हणजे शेकडो जनावरं नाना प्रकारे ओरडून आरडून नुसता हलकल्लोळ माजवितात. पण हत्ती मागे फिरून पाहत देखील नाही त्यांच्याकडे! तुझी जर कुणी अशी कुचाळी करील तर तू काय समजशील?

(१)

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः।।

नरेंद्र, भवनाथ आणि मास्तर

मास्तर तेव्हा वराहनगरातच आपल्या बहिणीकडे होते. त्या अद्भुत पुजाऱ्याच्या पावन दर्शनाने मनाला चटक लावल्यापासून नेहमी त्याचेच विचार मनात घोळताहेत. सदा जणू तीच आनंदमय मूर्ती डोळ्यांसमोर नाचते आहे नि तीच अमृतमय वाणी कानात सारखी घुमते आहे. त्यांना राहून राहून वाटे की, केवढे हे आश्चर्य! य:कश्चित् दरिद्री ब्राह्मण हा – ही सारी प्रगाढ तत्त्वं ह्याला गवसलीत तरी कशी? कुठून मिळवलं असेल ह्यानं हे लोकोत्तर ज्ञान? असल्या प्रासादिक सुबोध रीतीने ह्या असल्या दुर्ज्ञेय तत्त्वकथा समजावून देताना मास्तरांनी अजूनपर्यंत कधी कुणाला पाहिले नव्हते. कधी त्यांच्या चरणांजवळ

*एखाद्याचे राहणीमान उच्च दर्जाचे असते म्हणजे काय तर त्याच्या गरजा तथाकथित वरच्या दर्जाच्या असतात.*

जाईन आणि कधी त्यांना पुन्हा एकदा पाहीन असे मास्तरांना होऊन गेले. जिवाला अहोरात्र हा एकच ध्यास!

पाहता पाहता रविवार उजाडला. मार्च महिन्याची पाचवी तारीख. वराहनगरच्या नेपालबाबूंना बरोबर घेऊन दुपारी तीन - चारच्या सुमारास ते दक्षिणेश्वरच्या बगिच्यात येऊन पोहोचले. श्रीरामकृष्ण त्याच पूर्वपरिचित खोलीत छोट्या पलंगावर बसलेले त्यांच्या दृष्टीस पडले. खोली भक्तमंडळींनी गच्च भरली होती. आज रविवार - फुरसतीचा दिवस. पुष्कळजण दर्शन घेण्यासाठी आले आहेत. अजून मास्तरांची कुणाशीच ओळखपाळख झाली नसल्यामुळे ते त्या घोळक्यात एका बाजूला जाऊन बसले. श्रीरामकृष्ण जमलेल्या भक्तांबरोबर हसतमुखाने बोलत असल्याचे त्यांना दिसून आले.

एका एकोणीस वर्षांच्या मुलाला उद्देशून, त्याच्याकडे तोंड करून श्रीरामकृष्ण मोठ्या आनंदाने संभाषण करीत होते. युवकाचे नाव नरेंद्र. नरेंद्र कॉलेजात शिकत असून 'साधारण ब्राह्मसमाजा'त त्याचे जाणेयेणे आहे. बोलणे खूप ओजस्वी, डोळे अत्यंत पाणीदार, चेहरा भक्तासारखा प्रेमळ.

संभाषणाच्या एकंदर ओघावरून मास्तरांनी अनुमानाने ताडले की, बोलणे विषयासक्त संसारी माणसांसंबंधी चालले आहे. ज्यांना केवळ ईश्वराचाच ध्यास लागलेला असतो अशा धर्मप्रिय सज्जनांची हे संसारातील किडे सारखी टवाळी करीत असतात. त्याचप्रमाणे ह्या दुनियेत दुष्ट लोकांचा नुसता सुळसुळाट असतो, त्यांच्याशी कशी वर्तणूक ठेवणे योग्य - वगैरे गोष्टीविषयी बोलणे चालले होते.

**श्रीरामकृष्ण : (नरेंद्रास) -** नरेंद्र, तुझं काय मत आहे? विषयी लोकांच्या जिभेला तर हाडच नसतं. पण तू पाहिलं नाहीस का की, हत्ती रस्त्याने जाऊ लागला म्हणजे शेकडो जनावरं नाना प्रकारे ओरडून आरडून नुसता हलकल्लोळ माजवितात. पण हत्ती मागे फिरून पाहत देखील नाही त्यांच्याकडे! तुझी जर कुणी अशी कुचाळी करील तर तू काय समजशील?

नरेंद्र : कुत्री भुंकताहेत असं समजेन नि काय!

**श्रीरामकृष्ण : (सहास्य) -** नको हं, इतक्या दूर नको जायला! (हशा.) परमेश्वर सर्वांभूती आहे. तरी, चांगल्या लोकांबरोबर घनिष्ठ संबंध ठेवायला हरकत नाही, पण वाईट लोकांपासून मात्र दोन हात दूर राहिलेलंच बरं. वाघामध्ये देखील नारायणच आहे, पण म्हणून काही त्याच्या गळ्यात नको जाऊन पडायला! (हशा.) जर म्हणशील की, वाघही तर नारायणच, मग पळावं काय म्हणून? याला उत्तर असं की, 'पळून जा' असं जे बजावतात तेही तर नारायणच ना, मग त्यांचं म्हणणं का ऐकू नये?

''एक गोष्ट सांगतो, ऐक. कोण्या एका जंगलात एक साधू राहत असे. त्याचे अनेक शिष्य होते. एक दिवस त्यानं आपल्या शिष्यांना उपदेश केला की, सर्वांभूती नारायण वसत आहे हे जाणून सगळ्यांना नमस्कार करीत जा. एके दिवशी त्यांपैकी एक शिष्य होमासाठी समिधा आणायला म्हणून वनात गेला. इतक्यात एकाएकी खूप कल्ला ऐकू येऊ लागला. 'आसपास कुणी असाल तर पळा हो पळा, एक पिसाळलेला हत्ती येत आहे,' - असं कुणीतरी मोठ्यानं आरोळी देऊन सांगत होतं. सर्वजण भराभर वाट फुटेल तिकडे पळाले. पण हे राजेश्री मात्र पळत ना. त्याचा विचार असा की, हत्तीही तर नारायणच, मग पळायचे ते काय म्हणून? तो तिथेच उभा राहून हत्तीला नमस्कार करीत त्याची स्तवस्तुती करू लागला. इकडे माहूत बिचारा घसा कोरडा करून ओरडून सांगत होता की, 'पळा, अहो पळा.' स्वारी तरी देखील हालेच ना. शेवटी हत्तीनं येऊन त्याला सोंडेत धरून एकीकडे पार भिरकावून दिले नि आपला रस्ता सुधारला. शिष्य रक्तबंबाळ होऊन बेशुद्ध पडला.

हा सारा प्रकार कानी येताच गुरू आणि आश्रम वासी बाकीचे शिष्य येऊन त्याला उचलून आश्रमात घेऊन गेले. तिथे त्यांनी त्याच्यावर औषधोपचार केले. काही वेळाने शुद्धीवर आल्यानंतर त्याला कुणीसं

विचारलं – 'हत्ती येत आहे हे ऐकून सुद्धा तुम्ही पळून का नाही गेलात?' त्यानं उत्तर दिलं, 'गुरुदेवांनीच नाही का सांगितलं आपल्याला की स्वयं नारायणच माणूस, जीवजंतू, सर्वकाही झाला आहे. म्हणूनच हत्तीनारायण येत आहे हे पाहून मी आपल्या जागेवरून दूर सरलो नाही.' त्यावर गुरू म्हणाले, 'बाबारे, हत्तीनारायण येत होता खरा, कबूल आहे अगदी. पण बेटा, माहूतनारायणानं तर तुला थांबायला मना केलं होतं ना?' सर्वच जर नारायण, तर मग त्याच्या तरी सांगण्याकडे तू कानाडोळा का बरं केलास? माहूतनारायणाचं देखील सांगणं ऐकत असतात!' (सर्वजण हसतात)

''शास्त्रात सांगितलं आहे, 'आपो नारायण: – पाणी नारायण आहे. परंतु काही पाणी देवपूजेला चालतं, तर काही फक्त हातपाय धुवायला, भांडी विसळायला किंवा कपडे धुण्याला चालतं. ते प्यायला अथवा देवपूजेला चालणार नाही. त्याचप्रमाणे साधू, असाधू, भक्त, अभक्त, सर्वांच्याच हृदयात नारायण आहे खरा, पण तरीही असाधू, भक्त, अभक्त अशा दुष्ट लोकांशी मिळूनमिसळून वागणं योग्य होणार नाही. अशांशी निकट संबंध घातकच. त्यांपैकी कुणाकुणाशी कधीमधी चारदोन शब्द बोललात तर चालेल. पण काहींशी तर तेही सपशेल वर्ज्य. अशा लोकांपासून चार पावलं दूर राहणंच इष्ट.''

***

## सुबोध वेल ५ चे उत्तर

| | | |
|---|---|---|
| | १ आ | जी |
| सं | २ धी | |
| | ३ वि | ज |
| भा | ४ चा | |
| | ५ र | वि |
| व्या | ६ ज | |
| | ७ न्म | |
| ब | ८ घे | |
| | ९ ता | स |
| आ | १० त | |
| | ११ म | ही |
| आ | १२ ग | |
| | १३ कृ | ष्ण |
| ग | १४ ती | |
| | १५ सं | ख्या |
| न | १६ भ | |
| | १७ व | धू |
| ओ | १८ हो | |
| | १९ ते | रा |

# पोलादी पंखांची राजहंसी : अनू आगा

आपल्या निवृत्तीबद्दल अनू म्हणतात, 'आपला उत्तराधिकारी तयार करणं याचा अर्थ हा नव्हे की अगदी जख्ख म्हातारे होईपर्यंत आपण खुर्चीला चिकटून राहावं आणि बाकी सगळ्यांनी वाट पाहावी की कधी एकदा या निवृत्त होतात! जोपर्यंत मी सर्वांना हवीहवीशी वाटते तोपर्यंतच मला पद सोडायचं होतं.

**डॉ. स्वर्णलता भिशीकर**
ज्ञानप्रबोधिनी, हराळी
८८८८०२६२८

त्या नेहमी हातमागच्या साड्या नेसतात. शरीरयष्टी कृश असली तरी व्यक्तिमत्त्वात एक शांत आत्मविश्वास आहे. सत्तरीच्या जवळ असल्या तरी त्यांची कार्यशक्ती अफाट आहे. २००४ साली त्या वर्षाला ३३०० कोटी उलाढाल असणाऱ्या थरमॅक्स उद्योगसमूहाच्या अध्यक्षा होत्या. महिला, मुलं आणि समाजातले उपेक्षित घटक यांच्याबद्दल अपार आस्था त्यांच्या पोटी आहे. त्या आहेत अनू आगा!

### माझा झोका!

संध्याछायांनी अनू आगांना कधीच भिववलं नाही. कारण त्यांचं तिशीनंतरचं सगळं आयुष्य म्हणजे एक जबरदस्त संघर्षकथा आहे. आणि यशोगाथाही आहे. त्यात आशा-निराशेचे टोकाचे खेळ आहेत. तरीही या समर्थ स्त्रीचा झोका सदैव उंचच जात राहिला आहे. आयुष्याच्या संधिकालात त्या स्वत:बद्दल म्हणतात, 'आज मी कधी नव्हे इतकी व्यग्र आहे. मी स्वत:ला रोजच काही प्रश्न विचारते. खरोखर आव्हान देईल असं काही काम मी केलं आहे का? समाजाने मला इतकं काही दिलं



आहे त्याची थोडी तरी परतफेड केली का? हे सारं केलं असेल तरच मला शांत झोप लागते.' अनू आगा दररोज ध्यान करतात. त्यांनी विपश्यना पध्दतीचं ध्यान प्रशिक्षण घेतलं आहे. त्या रोज नियमित पायी चालतात, व्यायाम करतात. आपल्या जीवनाचा इतरांना जास्तीत जास्त उपयोग व्हायला पाहिजे असेल तर शरीर सुस्थितीत ठेवणं ही आपली जबाबदारी आहे, असं त्या मानतात.

एका संपन्न पारशी कुटुंबात अनूचा जन्म झाला. टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेसमध्ये त्यांनी मेडिकल आणि सायकीॲट्रीक सोशल वर्कचं शिक्षण घेतलं आणि अमेरिकेत फुलब्राईटसारखी मानाची शिष्यवृत्ती घेऊन ती पुढचं शिक्षण करुन आली. देखणी आणि बुध्दिमान अनू मित्रमैत्रिणींच्यात लोकप्रिय होती. यात नवल ते काय? या सुंदर फुलपाखराचं रुपांतर एके दिवशी सुखाच्या पाण्यावर जोडीदारासह पोहणाऱ्या राजहंसीमध्ये झालं आणि नियतीनं जेव्हा तिला प्रचंड आघात करणाऱ्या वादळी सागरात नेऊन ठेवलं, तेव्हा या राजहंसीचे पंख पोलादाचे झाले! ज्यांनी तिला पूर्वी पाहिलं होतं ते तिच्यातील कर्तृत्वाच्या सामर्थ्याच्या दर्शनाने चकित झाले.

## नियतीचा आघात

रोहिंटन आगा यांच्याशी अनूचा विवाह झाला. रोहिंटन यांचा स्वभाव इतका चांगला होता आणि कर्तृत्व एवढं लक्षवेधी होतं की पारशी समाजातल्या नवतरुणींना अनूचा हेवा वाटू लागला. त्यांच्या पहिल्या मुलीचं नाव मेहेर. मेहेर आता थरमॅक्सची अध्यक्षा आहे. ती आईसारखीच कर्तृत्ववान आहे. मेहेरनंतर अनूच्या पोटी जी मुलगी जन्मली ती लवकरच देवाघरी गेली. पारशी समाजात चार दिवस मृत्यूचा दुखवटा पाळला जातो. बाहेर कुठे जायचं नसतं. अनूने आणि रोहिंटनने दुखवटा पाळायला सरळ नकार दिला. ही बंडखोरी परंपरा पाळणाऱ्या त्यांच्या नातेवाईकांना धक्कादायक होती! मेहेरनंतर कुरुशचा जन्म झाला. त्याच्या हृदयाला छिद्र होतं पण सुदैवाने ते आपोआप भरून आलं. अनूच्या वडिलांचा उद्योग रोहिंटन नुसते सांभाळत नव्हते तर वाढवत होते. दोन मुलांना वाढवीत अनू गृहिणीचं शांत समाधानी आयुष्य जगत होती. १९८२ मध्ये रोहिंटन यांना हृदयविकाराचा तीव्र झटका आला आणि बायपास सर्जरी करून घेण्यासाठी त्यांना लंडनला जावं लागलं. शस्त्रक्रियेनंतर दोनच दिवसात त्यांना अर्धांगवायूचा तीव्र झटका आला आणि अपंगत्वही आलं. अनूचा विवाह एका अत्यंत बुध्दिमान, कर्तबगार आणि संवेदनशील व्यक्तीशी झाला होता. पण या दोन अपघातांनंतर त्यांची अवस्था अनूला पाहावत नव्हती. आपण कोण आहोत याची त्यांना निराशेचे, उद्विग्नतेचे झटके वारंवार येत. या अनपेक्षित परिस्थितीला तोंड देत मुलांना वाढवताना अनू थकून गेली होती.

## पतिवियोग आणि नवं दायित्व

रोहिंटन यांच्या रागाचे उद्रेक होत. त्यांचं चमत्कारिक वागणं अनूला सहन होत नसे. एकदा तर

मनात घटस्फोटाचा विचारही येऊन गेला! तिने स्वत:ला समजावलं की आपलं या माणसावर नितांत प्रेम आहे. काहीही झालं तरी आपण याला सोडू शकत नाही. पण मग यावर उपाय काय? आजारी असलेल्या रोहिंटनला तिने कणखरपणे सांगितलं की त्याचं वागणं ती मर्यादेबाहेर सहन करू शकणार नाही. या खंबीर धोरणामुळे रोहिंटन सावरले आणि अनूलाही थोडी स्वस्थता मिळाली. ज्यावेळी थरमॅक्सच्या संचालक मंडळाला कल्पना आली की रोहिंटन आता थरमॅक्सचे नेतृत्व करायला असमर्थ आहेत तेव्हा त्यांनी सुचवलं की अनूने थरमॅक्सचं काम पाहायला सुरुवात करावी. निश्‍चयी बुध्दिमान अनूने हे आव्हान स्वीकारलं. १९९३ मध्ये एचआरडी म्हणजे मानव संसाधन विभागात त्यांनी कामाला सुरुवात केली. टाटा इन्स्टिट्यूटमधला समाजकार्याचा अनुभव त्यांना इथे उपयोगी पडला. १९९६ मध्ये मेहेरच्या बाळंतपणासाठी अनू लंडनला गेल्या होत्या. रोहिंटन जबरदस्त जिद्दीने पुन्हा कार्यक्षम होऊ पाहात होते. ते त्यावेळी भारतात होते. ‘अनूला आणायला मी मुंबई विमानतळावर जाणार आहे’ असे त्यांनी घरात सांगितलं देखील होतं. पण अनूवरच्या आघातांची परंपरा अजून संपलेली नव्हती. अनू येण्याच्या आदल्याच दिवशी रोहिंटनला हृदयविकाराचा तीव्र झटका आला आणि अनूची साथ सोडून ते कायमचे निघून गेले. परतल्यावर अनू सुन्न होती. थरमॅक्सच्या संचालक मंडळाने असा प्रस्ताव ठेवला की अनूने आता आपल्या पतीची जागा घ्यावी. सुरुवातीला अनूला ही कल्पनाही सहन होईना पण कालांतराने मन घट्ट करुन ती वास्तवाला सामोरी गेली त्यावेळी या राजहंसीचे पंख पोलादाचे झाले होते. तिने एका ठिकाणी म्हटलं आहे, ‘जेव्हा तुम्ही फारच सहजपणे जगत असता, स्वत:ला आपण जास्तीत जास्त काम केलं पाहिजे याची जाणीव करून देत नाही त्यावेळी स्वत:च्या शक्तींची जाणीव स्वत:ला देणं महत्वाचं असतं. त्यावेळी म्हणावं लागतं की मी सामान्य नाही. मी खूप काही करू शकते. मग जेव्हा तुम्हाला खूप यश मिळू लागतं, तुमचा अहंकार फुलायला लागतो त्यावेळी स्वत:ला सांगावं लागतं की तू चारचौघींसारखीच आहेस. आपल्यातलं सामान्यत्व आणि असामान्यत्व यांचा समतोल राखणं फार अवघड असतं पण ते करावंच लागतं?’

## पुत्रवियोग

अजूनही नियतीचं समाधान झालेलं नव्हतं. पतीच्या मृत्यूचं दु:ख थोडं शांत होत आहे नाही अशा काळात ऐन उमेदीचा हाताशी आलेला तरुण मुलगा कुरुश याचं एका दुर्दैवी अपघातात निधन झालं. एका मोठ्या उद्योगाचं दायित्व घेतलेल्या या आईला शोक करत बसणं सुध्दा परवडणारं नव्हतं. त्यांच्या पतींचे काही निर्णय चुकीचे झाल्यामुळे गुंतवणूकदारांची नाराजी उद्योगाला पत्करावी लागत होती. थरमॅक्सची ही नाजूक दिसणारी संचालिका कठोरपणे उद्योगाचं परीक्षण करू लागली. तिने उद्योगाची सर्व सूत्रं आपल्या हाती घेतली. आता यशाचं नवीन पर्व सुरू होत होतं. थरमॅक्सचा लौकिक देश-विदेशात वाढता होता. त्यांनी संचालिका म्हणून कामाला सुरुवात केली त्यावेळी थरमॅक्सची वार्षिक उलाढाल ६०० कोटींची होती. २००४ मध्ये आपली मुलगी मेहेर हिच्या हाती संचालिकापदाची जबाबदारी सोपवून अनू निवृत्त झाल्या तेव्हा ही उलाढाल १२०० कोटींची झालेली होती. निवृत्त झाल्यावर अनूंनी त्यांना प्रिय असणाऱ्या सामाजिक कार्यात स्वत:ला झोकून दिलं. आकांक्षा या समाजसेवी संस्थेच्या मदतीने त्यांनी पुण्यात वंचित मुलांसाठी दोन उत्तम शाळा सुरू केल्या. त्यांना असा विश्‍वास आहे की, या वंचित विद्यार्थ्यांमधून उद्याचं अखिल भारतीय स्तराचं तरुण नेतृत्व उभं राहू शकेल.

## शब्द एक ऋजू-समर्थ स्त्रीचे

आपल्या निवृत्तीबद्दल अनू म्हणतात, ‘आपला उत्तराधिकारी तयार करणं याचा अर्थ हा नव्हे की अगदी जख्ख म्हातारे होईपर्यंत आपण खुर्चीला चिकटून राहावं आणि बाकी सगळ्यांनी वाट पाहावी की कधी एकदा

*जन्म - मृत्यूच्या दरम्यान असणाऱ्या या जीवनाला काळ आणि शक्ती यांची मर्यादा असते हे आपण लक्षात घेतले पाहिजे !*

या निवृत्त होतात! जोपर्यंत मी सर्वांना हवीहवीशी वाटते तोपर्यंतच मला पद सोडायचं होतं. व्यवस्थापन समितीला मेहेर अध्यक्ष म्हणून हवी होती आणि मलाही माझ्या आवडीचं कार्य करायचं होतं. माझा शिक्षण घेण्याचा प्रवास अजूनही चालू आहे. माझ्या आयुष्यातला प्रत्येक बरावाईट अनुभव मला काही तरी शिकवून गेला आहे.'

मुलींना कसं वाढवावं याबाबत माझा काही विचार आहे. अधिकाधिक महिला विविध क्षेत्रांमध्ये निर्णयप्रक्रियेत सहभागी असायला पाहिजेत परंतु त्यासाठी घरातून त्यांचं तसं शिक्षण व्हायला पाहिजे. आमच्या घरात लहानपणी माझा आवाज जरा चढला तरी सगळे सांगायचे, 'मुलीच्या जातीने असं बोलू नये. माझ्या भावांनी शाळेत अभ्यास केला नाही तर त्यांना रागवायचे कारण त्यांनी मोठे होऊन कमावते झाले पाहिजे. त्यांनी समजूतदारपणा आणि स्वत:च्या क्षेत्रात यश मिळवण्याची जिद्द शिकवली पाहिजे. तशीच ती मुलींनाही शिकवली



पाहिजे. तुम्ही मनावर घेतलंत तर तुम्ही मोठं कर्तृत्व करू शकता असा आत्मविश्वास मुलींना दिला पाहिजे. त्यांना त्यांच्या आवडीनिवडीनुसार कामाचं क्षेत्र निवडण्याची आणि त्यात मोठी उंची गाठण्याची संधी मिळाली पाहिजे.

एका ऋजू आणि समर्थ स्त्रीचे हे शब्द आपला समाज नीट कान देऊन ऐकेल का?

संदर्भ : सुधा मेनन यांचा लेख



*सृष्टिकर्त्याने आपल्याला शक्तीच्या निर्मितीचे एक यंत्र दिले आहे - पंचकर्मेंद्रिये आणि पंचज्ञानेंद्रियांचे हे शरीर.*

*आपल्या जीवनात कोणी मार्गदर्शक असे तर आपण लवकर शिकू शकतो. अन्यथा ते कौशल्य मिळविण्यास खूप कष्ट घ्यावे लागतात.*



# प्रश्नोपनिषद् भाग-१

हे प्राणा, तू जेव्हा पाऊस पाडतोस, तेव्हाच प्रजा अन्न प्राप्त करू शकतात आणि त्यामुळे त्या आनंदित होतात. हे प्राणा, तू व्रात्य (संस्काररहित) असलास तरी तूच एकमात्र श्रेष्ठ ऋषी आहेस. आम्ही सर्व प्रकारची भोजन सामग्री तुला अर्पण करीत असतो. ती खाणारा तूच आहेस. तूच संपूर्ण विश्वाचा स्वामी आहेस. तूच आकाशाला विचरण वायू आहेस.

**मा. गो. वैद्य**
नागपूर.
०९८८१७१७८०९

**'प्रश्नोपनिषद्' हे अथर्ववेदाच्या पैप्पलाद शाखेशी संबद्ध आहे.**

## प्रारंभ

पिप्पलाद नावाचे एक ऋषी होते. त्यांना सहा जिज्ञासू ब्रह्मनिष्ठांनी काही प्रश्न विचारले. पिप्पलाद ऋषींनी त्या प्रश्नांना समर्पक उत्तरे देऊन त्यांचे समाधान केले. या उपनिषदाचे संपूर्ण अंतरंग या प्रश्नांनी व्याप्त असल्यामुळे या उपनिषदाला 'प्रश्नोपनिषद्' असे सार्थ नाव मिळाले आहे. हे संपूर्ण उपनिषद गद्यात आहे.

### सहा ब्रह्मनिष्ठ

कोण होते हे ब्रह्मनिष्ठ जिज्ञासू? एक होता भरद्वाज ऋषीचा पुत्र सुकेशा, दुसरा शिबीचा मुलगा सत्यकाम, तिसरा गर्ग गोत्रात जन्मलेला सौर्यायणी, चौथा कोसल देशाचा आश्वलायन, पाचवा विदर्भनिवासी भार्गव आणि सहावा होता कत्य नावाच्या ऋषीचा प्रपौत्र (पणतू) कबंधी. हे सहाही जिज्ञासू ब्रह्म म्हणजे काय, हे जग कसे निर्माण झाले, हे जाणून घेण्यासाठी

निघाले. त्यांना पिप्पलाद ऋषीच्या माहात्म्याची माहिती होती. ते हातात समिधा घेऊन पिप्पलादाला शिष्यभावाने शरण गेले; आणि त्यांना आम्हाला काही विचारावयाचे आहे, असे म्हटले. पिप्पलाद म्हणाले, ''तुम्ही ब्रह्मचर्याचे पालन करीत, तपाचरण करीत, श्रद्धापूर्वक एक वर्ष या आश्रमात राहा; आणि नंतर तुम्ही आपल्या इच्छेप्रमाणे प्रश्न विचारा.''

### पहिला प्रश्न

याप्रमाणे गुरूने वर्षभर त्यांचे आचरण बघितले आणि त्यांना प्रश्न विचारण्याची सूचना केली. प्रथम कात्यायन (कत्य ऋषीचा प्रपौत्र) कबंधीने प्रश्न विचारला. तो म्हणाला, ''भगवन्, ही सर्व प्रजा कशी उत्पन्न होते?''

पिप्पलाद म्हणाले, ''परमेश्वरालाच प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा झाली. म्हणून त्याचे नाव प्रजापती आहे. त्याने तप केले आणि त्याने एक जोडपे उत्पन्न केले. 'रयि' आणि 'प्राण' ही त्यांची नावे. या जोडप्याने अनेक प्रकारची प्रजा उत्पन्न केली. आदित्य हा 'प्राण' आहे आणि चंद्रमा ही 'रयि' आहे. जे जे मूर्त म्हणजे आपणास दिसते ते सर्व 'रयि' होय. तात्पर्य हे की, समस्त भूतसमुदाय म्हणजे 'रयि' आणि त्यांच्यात जी चेतनाशक्ती आहे ती 'प्राण' होय. म्हणजेच 'प्राण' चेतना आहे, तर 'रयि' प्रकृती आहे.

''सूर्य पूर्व दिशेला उगवतो. त्यावेळी तो सर्व प्राण्यांमधली प्राणशक्ती किंवा जीवनशक्ती म्हणा, आपल्या किरणांमध्ये धारण करतो. त्याचप्रमाणे सर्व प्राण्यांच्या शरीरात 'वैश्वानर' या नावाने प्रसिद्ध असलेला जो जठराग्नी आहे, ज्याच्यामुळे अन्नाचे पचन होते, तो वैश्वानर या सूर्याचाच अंश आहे.

### दक्षिणायन, उत्तरायण

''याचप्रमाणे संवत्सर प्रजापती आहे. त्याची दोन 'अयने' म्हणजे गती आहेत. एक दक्षिणायन आणि दुसरे उत्तरायण. या जगात लोक दोन प्रकारची कर्मे करतात. एक असते 'इष्ट'. दुसरे असते 'पूर्त'. 'इष्ट' म्हणजे यज्ञयागादी विधी. रोजचा वैश्वदेव हाही 'इष्ट'च. आणि पूर्त म्हणजे 'समाजहिताची कर्मे'. जसे विहीर, तलाव वगैरे निर्माण करणे, धर्मशाळा, धर्मार्थ दवाखाना, विद्यालय इ. ची. स्थापना करणे म्हणजे पूर्त. 'इष्ट' आणि 'पूर्त' करणारे चंद्रलोकाला प्राप्त होतात; आणि मृत्यूनंतर पुन: जन्म घेतात. हा दक्षिणायनाचा मार्ग म्हणजेच 'पितृयाण' मार्ग होय. तोच 'रयि' होय.

''जे उत्तर मार्गाने जातात, ते लोक तप, ब्रह्मचर्य, श्रद्धा, विद्या यांची उपासना करतात, आणि या उपासनेद्वारे आदित्यलोक प्राप्त करतात; आणि ते पुन: जन्म घेत नाहीत.'' भगवद्गीतेतही वेगळ्या शब्दांत हेच सांगितले आहे. ''अग्निर्ज्योतिरह: शुक्ल: षण्मासा उत्तरायणम् । तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जना: ।। धूमो रात्रिस्तथा कृष्ण: षण्मासा दक्षिणायनम्। तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते् ।। (अध्याय ८, श्लोक २४, २५)

''आदित्यरूप प्रजापती हा, १२ महिने व पर्जन्य यांचा कारक म्हणजे निर्माता आहे. त्याच्या रथाला सात घोडे आहेत आणि रथाच्या नाभीत सहा आरे एकत्रित आहेत. हा आदित्य महिन्याच्या स्वरूपाचाही आहे; त्याचा कृष्ण पक्ष हा 'रयि' आणि शुक्ल पक्ष हा 'प्राण' आहे. तसेच अहोरात्र म्हणजे प्रजापतीच होय. दिवस त्याचा 'प्राण' आहे आणि रात्र 'रयि' आहे. याचप्रमाणे अन्न हे प्रजापती आहे. त्यापासून वीर्य उत्पन्न होते; व त्यामुळेच अनेक प्रकारची प्रजा जन्म घेते. या प्रजापतीच्या व्रताचे जे पालन करतात, ते जोडपी निर्माण करीत असतात. त्यांना ब्रह्मलोक प्राप्त होत असतो. त्यांच्या ठायी कसलेच कपट नसते.''

सारांश असा की, प्राण व रयि, सूर्य आणि चंद्र, संवत्सर आणि मास, दिवस व रात्र, अन्न आणि वीर्य अशा जोड्या सांगून या जोड्यांपासून प्रजानिर्मिती झाली, असे पिप्पलाद ऋषी सांगतात. येथे पहिला प्रश्न संपतो.

### दुसरा प्रश्न

यानंतर विदर्भवासी भार्गवाने दुसरा प्रश्न विचारला. तो म्हणाला, ''किती देव प्रजेचे धारण करतात? लोकांना

प्रेरणा कोण देतो? आणि त्यातील वरिष्ठ म्हणजे श्रेष्ठ कोण?''

### पिप्पलादांचे उत्तर

''आकाश, वायू, अग्नी, जल व पृथ्वी ही पंचमहाभूते, वाणी, मन, नेत्र व श्रोत्र (कान) ही इंद्रियेही देवच आहेत. हे देव प्रकट झाल्यानंतर आपसात भांडण करू लागले की, आम्हीच या शरीराची धारणा करू शकतो. त्यांना प्राण म्हणाला, ''तुम्ही असा वेडेपणा करू नका. मीच स्वत:ला पाच प्रकारात विभक्त करून शरीर धारण करीत असतो. परंतु प्राणाच्या या बोलण्यावर इतरांचा विश्वास बसला नाही. तेव्हा प्राण, शरीर सोडून निघून गेल्यासारखा वागला. तो बाहेर जाऊ लागताच, नेत्रादी सर्व इंद्रिये निस्तेज झाली. मधाच्या पोळ्यातील राणी मक्षिका बाहेर पडताच, जशा इतर सर्व मक्षिका बाहेर पडतात, तशीच शरीराची स्थिती झाली. तेव्हा वाणी, मन, डोळे, कान, या सर्वांनी प्राणाचे श्रेष्ठत्व मान्य केले; आणि त्यांनी प्राणाची स्तुती करणे सुरू केले.''

### प्राणाची स्तुती

ते म्हणाले, ''हा प्राण अग्नी होऊन दाहक होतो. हाच सूर्य, पर्जन्य, इंद्र, वायू, अन्न, सत्, असत्, अमृत आहे. रथाच्या नाभीत ज्याप्रमाणे आरे एकत्रित झालेले असतात, तसेच प्राणात सर्व इंद्रिये एकवटलेली असतात. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, यज्ञ, क्षत्रिय, ब्राह्मण हे सारे या प्राणामध्ये प्रतिष्ठित आहेत. हे प्राणा, तूच प्रजापती आहेस, तूच गर्भात उत्पन्न होतोस, या सर्व प्रजा तुलाच समर्पण करतात. म्हणजे तुझ्याच तृप्तीसाठी अन्न भक्षण करतात. हे प्राणा, देवतांना हवी (आहुतिद्रव्य) पोचविणारा श्रेष्ठ अग्नी तूच आहेस, पितरांच्यासाठी स्वधा (अन्न) देणारा तूच आहेस. हे प्राणा, तूच तेजस्वी इंद्र आहेस, रक्षण करणारा रुद्र आहेस, अंतरिक्षात संचार करणारा तेजोनिधी सूर्य तूच आहेस. हे प्राणा, तू जेव्हा पाऊस पाडतोस, तेव्हाच प्रजा अन्न प्राप्त करू शकतात आणि त्यामुळे त्या आनंदित होतात. हे प्राणा, तू व्रात्य (संस्काररहित) असलास तरी तूच एकमात्र श्रेष्ठ ऋषी आहेस. आम्ही सर्व प्रकारची भोजन सामग्री तुला अर्पण करीत असतो. ती खाणारा तूच आहेस. तूच संपूर्ण विश्वाचा स्वामी आहेस. तूच आकाशाला विचरण वायू आहेस. हे प्राणा, वाणीमध्ये, कानामध्ये, नेत्रांमध्ये तू नित्य राहा. त्यांच्यातून कधीही निघून जाऊ नकोस. त्या सर्वांचे तू कल्याण कर. हे संपूर्ण त्रैलोक्य प्राणाच्या अधीन आहे. हे प्राणा, आई ज्याप्रमाणे आपल्या पुत्रांचे पालन करते, त्याप्रमाणे तू आमचे रक्षण कर. आम्हाला प्रज्ञा आणि लक्ष्मी दे.''

इथे दुसरा प्रश्न संपतो.

***



*शक्तीचा शाश्वत स्त्रोत आपल्या हृदयात आहेच. बाकीचे सर्व स्त्रोत क्षणभंगुर आहेत. आपली अशी दृढ श्रद्धा असेल तर आपण मृत्यूलाही जिंकू - अमर होऊ !*

*‘माणूस घडवणं’ हा सर्व मानवी प्रयत्नातील मूलभूत प्रयत्न होय ! जेव्हा माणूस घडतो, तेव्हा ओघानेच समाज आणि राष्ट्र दोन्ही घडत असतात.*

# तेनाली रामन आणि आजची जनरेशन

आपण सर्वांनीच तेनाली रामनच्या कथा ऐकल्या, वाचल्या किंवा पाहिल्या असणार. भारतीय संस्कार कथेत तेनाली रामनला अतिशय महत्व प्राप्त झालं आहे. आपल्या भारतीय परंपरेत कथेतून संस्कार करण्याची एक जुनी प्रथा आहे. असं म्हणतात की, जिजाऊंनी शिवरायांना पराक्रमाच्या कथा ऐकवल्या व त्याचा शिवरायांच्या मनावर प्रचंड प्रभाव पडला. अर्थात नुसत्या कथा ऐकून शिवराय घडले नाहीत. पण आपण आपल्या लेखापुरतेच बोलू. तर तेनाली रामनच्या अनेक कथा तशा विनोदी अंगाने जातात. तेनाली रामनची बुद्धिमत्ता, प्रत्येक गोष्टीकडे पाहण्याचे वेगळेपण यामुळे तेनाली राजदरबरात उठून दिसतो.

तेनाली रामनची प्रचलित कथा आहे. राजा कृष्णदेवरायच्या राज्यात एक पंडित येतो. पंडित भारतातील सगळ्या भाषा अस्खलित बोलायचा. तो कृष्णदेवरायाला आव्हान देतो की दरबारातील हुशार माणसांनी त्याची मातृभाषा ओळखून दाखवायची. कुणालाच हे जमत नाही. शेवटी तेनाली पंडिताची मातृभाषा अचूक ओळखतो. अशी ही सर्वसाधारण कथा आहे. ही कथा आजच्या जनरेशननुसार पाहू. समजा की तो पंडित कॉन्व्हेंटमधून शिकलेला आहे. आता तो राजा कृष्णदेवरायाच्या राजधानीत येतो व राजाला खुले आव्हान करतो की, दरबारातील हुशार मंडळींनी माझी मातृभाषा ओळखून दाखवावी. तरच मी म्हणेन की आपल्या राज्यात हुशार लोक सुद्धा राहतात. आता दरबारातील माणसं पंडिताशी विविध भाषांत बोलायला सुरुवात करतात. पण कुणालाच पंडिताची मातृभाषा ओळखता येत नाही. तेव्हा तेनाली रामन हे आव्हान स्वीकारतो व पंडितासोबत एक दिवस घालवण्याची अनुमती मागतो. पंडित यासाठी त्याला अनुमती देतो. तेनाली



पंडितासोबत गप्पा मारतोय. शेवटी तेनाली आपली चाल खेळतो. तेनाली पंडिताला एका ठिकाणी नेतो, जिथे तेनालीने आधीपासूनच जमिनीवर काटे टाकून ठेवलेत. एक काटा पंडिताच्या पायात घुसतो. आता तेनाली आत्मविश्वासात उभा आहे. कारण तेनालीच्या प्लॅननुसार ज्यावेळी माणसाला दुखापत होते, तेव्हा तो मातृभाषेत कळवळतो व मातृभाषेतंच ईश्वराला साद घालतो. तेनाली रामन पंडिताच्या चेहऱ्याकडे उत्सुकतेने पाहत आहे आणि काटा लागल्यामुळे पंडित जोरात कळवळून बोलतो, ओह माय गॉड.... आणि तेनालीचा पचका होतो...

काय पटतंय ना? अहो कॉन्व्हेंटमध्ये शिकलेली आजची जनरेशन आईला मम्मी म्हणतात. मग देवाला गॉडंच म्हणणार ना? तुम्ही ओळखू शकाल का या पंडिताची मातृभाषा?

लेखक : **जयेश शत्रुघ्न मेस्त्री**
मोबाईल : ९९६७७९६२५४
ईमेल : contactmestrysolutions.in



# माननीय एकनाथजींनी सांगितलेला सेवेचा अर्थ



**बी. निवेदिता**
*राष्ट्रीय उपाध्यक्ष,*
*विवेकानंद केंद्र कन्याकुमारी*

'राउंजिंग कॉल टू दि हिंदू नेशन' या पुस्तकाचे काम करताना एकनाथजींनी स्वामीजींचे सगळे विचार वाचले आणि त्यातल्या काही विचारांनी एकनाथजी प्रभावित झाले. ते विचार असे होते, 'धर्म हा भारताच्या जीवनाचा केंद्रबिंदू आहे. ते भारताचे रक्त आहे. आपली धर्माबाबतची समजूत गैरसमजांनी आच्छादित झाली तेव्हा भारताचे राष्ट्रीय जीवन चैतन्य गमावून बसले. त्यातली गतिशीलता हरवली. भारताचा अध:पात धर्मामुळे झाला असे सांगितले जाते पण ते सत्य नाही. आपला अध:पात धर्माविषयीच्या भ्रांत कल्पनांमुळे झाला आहे. धर्म हा मंदिरातल्या पूजापाठापुरता मर्यादित नसतो. धर्म तर सर्वच ईश्वर पहायला सांगत असतो आणि या विराट शक्तीची पूजा सेवा करायला सांगत असतो. तो जित्या-जागत्या देवाची पूजा करायला सांगत असतो.

*आदर्श समाजव्यवस्था समाजातील प्रत्येक घटकाला अंतिम उद्दिष्टापर्यंत पोहोचाविण्यास भरपूर वाव देते, संधी देते.*

माणसाची सेवा हीच ईश्वराची पूजा. धर्म आपल्याला ईश्वर एकच असल्याचे सांगतो आणि उत्स्फूर्तपणे इतरांना मदत करण्यास तसंच आपली कर्तव्ये प्रेमाने बजावायला सांगत असतो. सर्वसंगपरित्याग आणि सेवा हे भारताचे राष्ट्रीय आदर्श आहेत. या आदर्शानुसार भारतमातेची सेवा करा, बाकीच्या सगळ्या गोष्टी ठीक होतील. प्रत्येक देशाचा मानवतेला एक विशिष्ट संदेश असतो. एक भागध्येय असते आणि एखादी विशिष्ट कामगिरी असते. भारतावर एक जबाबदारी आहे. ईश्वराच्या एकत्वाच्या तत्त्वावर काम करणारा समाज जगाला देणे ही ती जबाबदारी होय. जो या देशात जन्माला आला त्याची जबाबदारीही तीच झाली. तेव्हा आपल्याला ऋषीमुनींनी केलेले आदर्श समाज निर्मितीचे कार्य पुढे सुरू ठेवायचे आहे.'

स्वामीजींच्या याच विचारांनी एकनाथजी प्रभावित झाले. सगळ्या अडचणींवर मात केली आणि स्मारक उभे केले. ते होताच एकनाथजींनी काही मान्यवरांशी स्मारकाच्या दुसऱ्या टप्प्याविषयी म्हणजे विवेकानंद केंद्राविषयी चर्चा सुरू केली. भारतात वसाहतवादी सरकार आणि ख्रिस्ती मिशनऱ्यांचे काम सुरू झाल्यापासून त्यांनी सेवेची विपर्यस्त कल्पना रुजवली. केलेल्या कामाचे श्रेय घेणे आणि बदल्यात बाटवाबाटवी धर्मांतर करणे ही त्यांची कार्यपद्धती. परदेशी पैशावर पोसलेल्या या प्रचारकांनी सेवेची संकल्पनाच बाधित केली. ही पद्धत म्हणजेच सेवा हा विचार समाजात दृढ केला. ते गरजवंतांना मदत देणारे मक्तेदार बनून गेले.

भारतीय पद्धत यापेक्षा वेगळी होती. तिच्यात लोकांना त्यांच्या कर्तव्याबाबत जागरूक केले जात असे. इतरांच्या गरजांबाबत संवेदनशील होण्याचे आवाहन केले जात असे आणि त्यातून समाजाच्या आतच अशी पद्धत गतिमान केली जात असे की, जिच्यातून गरजू व्यक्तींच्या गरजा आपोआप भागवल्या जात असत. अशा या समाजाला अनाथालये, परित्यक्तागृहे, वृद्धाश्रम यांची गरजच नव्हती. या समाजात अनाथांचे पालन होत होते. वृद्धांची सेवा होत होती आणि परित्यक्तांना आश्रय मिळत होता. तेव्हा आमच्या समाजात सेवा वाढवायची असेल तर त्यासाठी सर्वांठायी ईश्वर असल्याचे मानणाऱ्या खऱ्या धर्माची प्रस्थापना करणे आवश्यक होते. धर्म म्हणजे हे आपले कर्तव्य जाणणे. हीच देशाची पुनर्बांधणी होती. पण काय करावे? धर्माची पुनर्स्थापना म्हणजे सेवा ही कल्पनाच कोणी केली नाही. एकनाथजी हे समाजाचे सूक्ष्म निरीक्षण करीत असत. भारतात सेवा ही संकल्पना सर्वांना भावते पण सेवा या शब्दाचा खरा भारतीय अर्थ विस्मरणात गेला आहे आणि मिशनरी मात्र त्याचा अर्थ त्यांच्या परीने का होईना पण जीवनात उतरवत आहेत.

सेवा कार्याविषयी एकनाथजी म्हणतात, ''भुकेलेल्यांना अन्न देणे, रुग्णांना वैद्यकीय सेवा पुरवणे आणि अज्ञानी लोकांना धर्मनिरपेक्ष माहिती देणे यालाच सेवाव्रती माणूस सेवा समजेल किंवा कोणाचीही गरजू माणसाची गरज पुरी करण्यालाही तो सेवा समजेल. पण अशा रितीने कोणत्याही प्राथमिक गरजा पुऱ्या करणे ही एक कमी दर्जाची सेवा आहे. पण कोणी तरी यापेक्षा वेगळी सेवा देतात. गरजूंना ज्ञान देतात, त्यांना स्वत:च्या पायावर उभे राहता यावे यासाठीचे कौशल्य, प्रशिक्षण देतात. त्यांना स्वयंपूर्ण करतात. ही खरी उच्च दर्जाची सेवा होय. यापेक्षाही उच्च दर्जाची एक सेवा असते जिच्यात उच्च दर्जाचे आणि सखोल ज्ञान दिले जाते. ज्यातून भ्रांती दूर होते आणि गरजू व्यक्ती स्वयंप्रकाशित होते. अंत:प्रेरित होते. पहिल्या दोन प्रकारात आपण गरजू व्यक्तीला आनंद दिला, पण तिसऱ्या प्रकारात आपण त्याला स्वत:लाच आनंद कसा प्राप्त करता येईल हे शिकवले. आपण त्याचे लक्ष मानवी समस्यांच्या मुळाकडे वेधले. आनंद म्हणजे काय, तो प्राप्त करून स्वत:च अनुभवता येईल अशी त्याची जाणीव करून घेता येईल याची त्याच्या आत असलेली साधना विकसित करायला आपण त्याला शिकवले.

ही व्यक्ती-व्यक्तीमधील सेवा आहे. पण जेव्हा असे ज्ञान असलेला समाजच अस्तित्वात असतो त्यात अशी जाणीव देणारी अंगभूत व्यवस्था असते. ज्यात

*आपण परमेश्वराच्या हातातील एक साधन आहोत, आपण त्याचंच कार्य करीत आहोत या दृढ श्रद्धेतून तुमचे कर्तव्य करा.*

गरजूंची काळजी घेतली जाते. प्रत्येकाला उपयुक्त शिक्षण मिळते. सन्मानाने जीवन यापन करता येईल असे प्रशिक्षण आपणाला मिळते. समाजातच असे वातावरण असते की ज्या लोकांतली स्वयंप्रकाशित होण्याची तहान भागविली जाते. ही भागवणारे संपन्न महात्मे समाजात असतात. अशा समाजात या व्यवस्थेची काळजी घेतली जाते. जिच्यात अशा सेवा कार्याचेही पोषण होते. अशा प्रकरचा समाज निर्माण करणे हीच सर्वोत्तम सेवा होय. असा सर्वांची भौतिक, मानसिक आणि आध्यात्मिक काळजी घेणारा धार्मिक समाज निर्माण करणे हे भारताचे इप्सित कार्य आहे. भारत हे शतकानुशतके करीत आला आहे. पण स्वामी विवेकानंद म्हणाले होते त्याप्रमाणे या कार्याची तर्कशुद्ध परिणती होऊ दिली नाही.

एकनाथजी म्हणतात, 'स्वामीजी म्हणत असत प्रत्येक देशाचे ठरलेले कार्य असते, विशिष्ट संदेश असतो आणि त्याचे विधिलिखित ठरलेले असते. भारताचे हे कार्य आणि जगाप्रती असलेले दायित्व कोणी तयार केलेले किंवा निर्माण केलेले नाही. एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे ते हस्तांतरित होत आले आहे. जुन्या काळातल्या द्रष्ट्या विचारवंतांनी या भारताच्या दायित्वाचा विचार दृढमूल करण्यासाठी आपले जीवन समर्पित केले आहे. त्यांची तप:श्चर्या, संशोधन, सारासार विचार यातून हा विचार उदयाला आला आणि त्यांनी तो आपल्याला दिला. या देशाची सेवा करू इच्छिणारांनी भारताचे हे दायित्व समजून घेतले पाहिजे. भारताचे ध्येय, नियती, संदेश यांच्या प्रकारात आपल्या सेवा कार्याकडे पाहिले पाहिजे. आपल्याला कोणत्या परिप्रेक्ष्यात कार्य करायचे आहे याबाबत त्यांनी अवगत राहिले पाहिजे.

हे मिशन किंवा औचित्य, दायित्व काय आहे? ते आहे एक आदर्श समाज उभा करण्याचे दायित्व. या आदर्श समाजात मनाच्या आणि शरीराच्या गरजा तर पूर्ण झाल्या पाहिजेतच पण माणसाच्या आतल्या गरजाही पूर्ण झाल्या पाहिजेत. आमच्या पूर्वजांनी अशी समाज व्यवस्था निर्माण केली होती. तसे ते मोठ्या आत्मविश्वासाने जाहीरही करू शकत होते आणि लोकांना ही व्यवस्था पहायला येण्यास पाचारण करू शकले असते. लोकांसाठी ही व्यवस्था अनुकरणीय होती. जगभरातल्या लोकांना अशी समाज व्यवस्था हवी होती. त्यांना ती देणे हे भारताचे काम आहे. मिशन आहे. ते नेहमीच तसे राहिले आहे. म्हणून आम्हीही राष्ट्र उभारणीचे कार्य करीत आहोत. ते आम्ही आमचे मिशन मानले आहे. कारण आताच्या काळात या देशाला आपल्या या कार्याचे, औचित्याचे विस्मरण झाले आहे. ते पुन्हा प्रस्थापित करायचे आहे. राष्ट्र उभे करायचे आहे, ते या भूमीचे दैवी कर्तव्य आहे. हा संदेश आज सर्वांना द्यायचा आहे. मतभेद विरहित समाज निर्मिती ही भारताने जगाला दिलेली अनमोल देणगी आहे. ती देणगी देणे ही अजोड आणि कल्पनातीत अशी सेवा आहे.

अशा रितीने राष्ट्र उभारणी हे सर्वोच्च सेवा कार्य आहे. राष्ट्र-उभारणी म्हणजे धर्माधिष्ठित समाज निर्मिती. अशा

**हे मिशन किंवा औचित्य, दायित्व काय आहे? ते आहे एक आदर्श समाज उभा करण्याचे दायित्व. या आदर्श समाजात मनाच्या आणि शरीराच्या गरजा तर पूर्ण झाल्या पाहिजेतच पण माणसाच्या आतल्या गरजाही पूर्ण झाल्या पाहिजेत. आमच्या पूर्वजांनी अशी समाज व्यवस्था निर्माण केली होती. तसे ते मोठ्या आत्मविश्वासाने जाहीरही करू शकत होते आणि लोकांना ही व्यवस्था पहायला येण्यास पाचारण करू शकले असते. लोकांसाठी ही व्यवस्था अनुकरणीय होती. जगभरातल्या लोकांना अशी समाज व्यवस्था हवी होती. त्यांना ती देणे हे भारताचे काम आहे.**

*परमेश्वराची निर्मिती परिपूर्णच आहे आणि जे बदल काळानुसार आवश्यक ठरतील ते त्याच्या इच्छेनेच होतात.*

धर्माधिष्ठित समाजाचे जगाप्रति असलेले योगदान हेच आहे भारताचे मिशन. आध्यात्मिकतेच्या आधारे सेवा देणे म्हणजे प्रत्येकाच्या आत असलेल्या आणि त्याच्या आसपास असलेल्या दैवी घटकांचे जागरण करणे, अशासाठी की तो प्रत्येकजण एकत्वाच्या आधारावर समाजाची सेवा करण्यास प्रेरित होईल अशा रितीने मनुष्याचा विकास केला जाईल. ज्यातून मानवाचा सर्व अंगांनी विकास होईल आणि त्यातून त्याच्या मनात त्याच्या देशाच्या मिशनविषयीची जाणीव वाढीस लागेल.

यापुढे जाऊन मानवाचे आध्यात्मिक उन्नयन व्हायचे असेल तर भारताने जगाला परमेश्वराच्या एकत्वाचे ज्ञान द्यावे लागेल. असे ज्ञान देण्यासाठी त्यावर आधारलेली समाज व्यवस्था निर्माण करावी लागेल. म्हणजेच धर्माधिष्ठित समाज निर्मिती. असा समाज निर्माण होणे ही ईश्वराचीच इच्छा आहे. आपण तर निमित्तमात्र आहोत. ही भावना मनात ठेवून केलेले सेवा कार्य म्हणजेच आध्यात्मिक साधना.

### ईश्वर शरणता आणि आध्यात्मिक साधना

सेवा कार्य हे जितके महत्वाचे असते तितकाच त्या संबंधीचा दृष्टीकोनही महत्वाचा असतो. एकनाथजींनी सेवा साधना या पुस्तकात सेवा ज्या भावनेने दिली जाते त्या सर्व भावना आणि दृष्टीकोनांची माहिती दिली आहे. त्यांनी दाखवून दिले आहे की, सेवा १) सहानुभूती किंवा दयेच्या भावनेतून दिली जाते. २) अनुकंपेच्या भावनेतूनही दिली जाते. ३) ती बंधुत्वाच्या, जवळिकीच्या किंवा कळवळ्याच्या भावनेनेही दिली जाते. ४) लोकप्रियता, ख्याती मिळावी म्हणून दिली जाते. ५) लोकांना उपकृत करून भविष्यकाळात काही तरी मिळवण्यासाठी सेवा दिली जाते. या सर्व प्रकारांतून अहंकार सुखावणे, श्रेष्ठत्वाच्या भावनेची पूर्तता होणे, आश्रयदाते असल्याची भावना संतुष्ट होणे असे प्रकार घडतात. या प्रकारात देणे आणि घेणे ही प्रक्रिया आहे. सौदेबाजी, सेवेतून काही तरी मिळवण्याचा हिशेब आहे.

असे जर आहे तर मग खऱ्या सेवेमागे कोणती प्रेरणा असावी? एकनाथजी म्हणतात, 'जी सेवा ईश्वराप्रति शरणागतीची भावना मनात ठेवून केली जाते ती सर्वात उत्तम आणि उदात्त सेवा होय. मी केलेली सेवा ही दैवी योजनेचा एक भाग आहे. मी देवाच्या वतीने ही सेवा बजावत आहे. तो ईश्वर सर्वांचं कल्याण करतो आणि त्यासाठी माझा वापर केवळ साधन म्हणून करीत आहे. मी तर त्याच्या हातातले एक उपकरण आहे. हे भान मनात ठेवून सेवेचे कार्य गांभीर्याने, प्रामाणिकपणे आणि आपल्याला शक्य असेल तेवढ्या उत्कृष्टपणे केले पाहिजे. देवाला जे गरजेचे आणि शक्य वाटते ते करवून घेण्यासाठी मला पाचारण केले आहे. ही भावना मनात ठेवून केलेले सेवा कार्य म्हणजे खरी सेवा होय. आपण जर 'त्याच' चे काम करीत आहोत. अशा सेवेतून आपले उन्नयन होते आणि आत्म साक्षात्कार होतो. तेच मानवी जीवनाचे सर्वोच्च ध्येय आणि इप्सित असते. कसल्या तरी अपेक्षा मनात ठेवून केलेल्या सेवा कार्यात सौदेबाजी येते. तर समर्पण आणि शरणागत भावनेने केलेल्या कामातून साधना होते.

यापुढे जाऊन मानवाचे आध्यात्मिक उन्नयन व्हायचे असेल तर भारताने जगाला परमेश्वराच्या एकत्वाचे ज्ञान द्यावे लागेल. असे ज्ञान देण्यासाठी त्यावर आधारलेली समाज व्यवस्था निर्माण करावी लागेल. म्हणजेच धर्माधिष्ठित समाज निर्मिती. असा समाज निर्माण होणे ही ईश्वराचीच इच्छा आहे. आपण तर निमित्तमात्र आहोत. ही भावना मनात ठेवून केलेले सेवा कार्य म्हणजेच आध्यात्मिक साधना. तुम्ही शिक्षक असाल, गृहिणी असाल, बँक कर्मचारी असाल, सामाजिक-राजकीय कार्यकर्ते असाल. पण आपण आपले तेच काम राष्ट्रीय विचाराने करत असाल म्हणजेच देशाची उभारणी एकत्वाच्या आधारावर करण्याचे सूत्र मनात ठेवून करत

असाल तर ती सर्वोच्च सेवाच होय.

### एकनाथजींची जन्मशताब्दी

त्या काळात एकनाथजी पत्रकार परिषदा आणि सभांतून आध्यात्मिकतेवर आधारलेल्या सेवेचे महत्व प्रतिपादन करीत देशव्यापी दौरे करीत असत. तेव्हा विवेकानंद केंद्राच्या या सेवेच्या कल्पनेचा प्रभाव अनेक युवकांच्या मनावर पडत असे. त्यातले सगळेच जण विवेकानंद केंद्राशी जोडले जात होतेच असे नाही पण ते या कल्पनेने भरले जात होते. त्यांच्या मनात ती कल्पना खोलवर रुजत होती. आजही अनेक लोक, आपण एकेकाळी एकनाथजींच्या विचाराने मोहित झालो होतो असे सांगत असतात.

समाजात एखादे नैसर्गिक संकट येते तेव्हा आपण तिथे धाव घेतली पाहिजे आणि आपदग्रस्तांचे पुनर्वसन केले पाहिजे. पण अशी सेवा करण्याची 'संधी' आपल्याला मिळावी म्हणून आपण संकटे कोसळण्याची मनिषा करता कामा नये. आपल्याला सेवा करण्याची 'संधी' मिळावी म्हणून समाजात अनाथ, वृद्ध आणि परित्यक्त्यांची संख्या वाढावी अशी इच्छा आपण करता कामा नये. अशा प्रकारचे लोक समाजात आहेत. हा रोग नाही, ती रोगाची लक्षणे आहेत. समाज जेव्हा स्वार्थी, व्यक्तिवादी, बोथट होतो तेव्हा तोच रोग असतो आणि अशाच समाजात असे आपदग्रस्त लोक निर्माण होतात आणि वाढतात. पण यावर कोणी असा प्रश्न विचारतील की, 'मग आम्ही अशा गरजू लोकांना मदत करायची नाही का?' त्यांची सेवा केली पाहिजेच कारण ती तातडीची गरज आहे. पण ती सेवा म्हणजे समाजासमोरच्या मूळ प्रश्नाचे उत्तर नव्हे.

गुणात्मक, खरी आणि सातत्यपूर्व सेवा तर तीच आहे जिच्यात सेवा देणारे आध्यात्मिक भावनेने गुंतलेले असतात. समाजातल्या गरजूंची हाक ऐकून ते एकत्वाच्या भावनेने त्यांच्या हाकेला ओ देतात. त्यांना भारताच्या ईश्वरदत्त कार्याची जाणीव असते, अशा समाजात अनाथ कोणी नसते आणि परित्यक्त्याही नसतात. महिलांकडे आदराच्या आणि सन्मानाच्या भावनेने पाहिले जाते.



वृद्धांची काळजी कृतज्ञतेच्या भावनेने घेतली जाते. अशा समाजातच लोकांच्या मनात मानवी जीवनाचा खरा अर्थ समजून घेण्याची जिज्ञासा, तळमळ वाढेल आणि त्यांच्या मनात जीवनाचा खरा अर्थ, औचित्य मूळ धरेल. आपण शरणागत भावनेने करतो ती सेवा श्रेष्ठ असते. या सेवेच्या खऱ्या अर्थाशी निगडित असलेली सेवा आपण समाजाला देऊया. मा. एकनाथजींना त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त खरी श्रद्धांजली ठरेल.

***

## लेखक शशीकांत मांडके यांना भावपूर्ण श्रद्धांजली

पुणे । विवेकानंद केंद्र मराठी प्रकाशन विभागातर्फे प्रकाशित अनेक पुस्तकांचे लेखक श्री. शशीकांत मांडके यांचे नुकतेच निधन झाले. लहान मुलांसाठी त्यांनी अनेक पुस्तके लिहीली आहेत. नाट्यरूप विवेकानंद, मित्रांनो आणि मैत्रिणींनो भाग १ व २, न दिसलेला विवेकचंद्र, अविस्मरणीय विवेकानंद, गोष्टी एकनाथजींच्या, कर्मयोगी एकनाथजी ही काही प्रमुख पुस्तके होत. त्यांच्या आत्म्यास सद्गती मिळो.




खिस्तपूर्व काळात कोणीही कोणत्याही देशात जावे, देव धर्म करावा, दर्शन पूजन करावे, मंदिर बांधणे यावर कोणतेही बंधन नव्हते. पूर्वी कम्बोडियाच्या अंगकोर वाट या जगप्रसिद्ध अति भव्य मंदिरामध्ये दर्शनासाठी यात्री म्यानमारमधील रंगूनमार्गे या जागतिक कीर्तीच्या मंदिरात यात्रेसाठी जात असत.

डॉ. विलास सावजी
०७२६३-२५२३५०

# हिंदूंचे अति प्राचीन भव्य मंदिर- अंगकोर

हिंदू धर्म व हिंदुत्व ही मानव जातीपासून अस्तित्वात असलेली जीवनशैली आहे. हिंदुत्व जगभरात पसरलेले असल्याच्या अनेक कारणांपैकी एक कारण असे की, हिंदू धर्मामध्ये तीर्थयात्रा करणे, विविध देवदेवतांचे दर्शन घेणे हे अतिशय पुण्याचे व महत्त्वाचे असे मानले जाते. साधू, संत हे नेहमीच तीर्थाटन करीत असतात व सामान्य जनांनाही त्यामुळे स्फूर्ती मिळून तीर्थाटन करून पुण्यप्राप्ती करण्याची प्रथा हिंदू धर्मामध्ये पूर्वापार आहे.

### युरोपियनांची राजवट

दक्षिण पूर्व आशियातील अनेक देशांवर युरोपियनांचे राज्य होते. जसे की म्यानमार (ब्रह्मदेश), थायलंड, सिंगापूर, मलेशिया, लाओस, व्हिएतनाम व कम्बोडिया या आजच्या देशांवर ब्रिटिश, फ्रेंच व डचांचे राज्य होते. अशा या विशाल प्रदेशावर राज्य करताना अनेक नियम, कायदे, अटी अशा या राज्यकर्त्यांनी घातल्या होत्या. त्यामुळे यात्रा करणे



कठीण होऊन बसले व अतिशय मर्यादित स्वरूपातच यात्रेकरू यात्रा करू शकत होते. यात्रा कमी झाल्याने तेथील देवस्थाने वैराण झाली. सर्वत्र जंगल वाढले व मानव वस्ती अडचणीत आली. नागरी सोयी-सवलती किंवा राहण्या, खाण्यापिण्याची व्यवस्था सुद्धा दूरापास्त होऊ लागली.

### अंगकोर मंदिर

दक्षिण पूर्व आशियातील हे सर्वात जुने व त्या काळातील भव्य मंदिर म्हणून याला मान्यता आहे. हे विष्णू मंदिर असून संपूर्ण कम्बोडियन जनतेचे अतिशय श्रद्धेचे असे स्थान आहे.

मध्यंतरीच्या मुस्लिम व ब्रिटिश राजवटीतील अनेक बंधनांमुळे हे मंदिर काळाच्या पडद्याआड जाते की काय, अशी परिस्थिती निर्माण झाली होती. या प्रदेशातील लोकांमध्ये जागृती होऊन जगातील सर्वात भव्य व जुने असे हे अंगकोर मंदिर पुन्हा नावारूपास येऊ लागले. तरीही अद्यापही तेथील यात्रा विशेष सुगम व सुखकर झालेली नाही.

या मंदिरात नेहमी मंत्रोच्चार व शंखध्वनी होत असत, तसेच अनेक प्रकारचे धार्मिक विधी अतिशय श्रद्धापूर्वक केले जात असत. या यात्रेवर बरीच बंधने आल्यामुळे सामान्य यात्री तर सोडाच, पण साधू-संतांनाही या कम्बोडियातील मंदिरात जाणे मुश्कील झाले होते. याशिवाय कम्बोडियावर जेव्हा कम्युनिस्ट राजवट आली होती तेव्हा कम्युनिस्ट सरकारने हे मंदिर जणू काही त्यांच्याच कार्यालयासारखे वापरायला सुरुवात केली व आम माणसाला येथे येणे-जाणे करण्यासाठी पूर्णपणे बंदी होती. मध्यंतरीच्या काळात अटलबिहारी वाजपेयी यांच्या कार्यकाळात या मंदिराकडे पुरातत्त्व विभागाचे लक्ष आकर्षित करण्यात आले व या खात्याने लाखो रुपये खर्च करून या मंदिराचा अंशतः जीर्णोद्धार केला. मेकांग गंगा परिकल्पना या काळात सरकारने अस्तित्वात आणली व भारत आणि दक्षिण पूर्व आशिया यांनी संयुक्त प्रयत्न करून या सर्व देशांतील लोकांच्या यात्रेला काही अंशी गती दिली होती.

### यात्रा कशी करावी

ही यात्रा कैलास मानस सरोवरसारखी कठीण यात्रा नाही. यात्रा साधारण प्रदेशातून व सामान्य हवामान असलेल्या भागातूनच आहे. मणिपूरमधील मोरेहनगरपासून या यात्रेला प्रारंभ केला जाऊ शकतो. मोरेहपासून विष्णुपूर या गावी पोहोचल्यानंतर तेथील अतिभव्य विष्णुमंदिराचे दर्शन घेऊन यात्रेकरू मुख्य यात्रेला सुरुवात करू शकतो. मोरेह हे भारताचे सर्वात शेवटचे सीमावर्ती गाव आहे. पुढे म्यानमार देशाची सीमा सुरू होते. नंतर मोरेह ते मांडले हे ३७५ मैलांचे अंतर ओलांडल्यानंतर पुढे मांडले ते रंगून हा सडकमार्ग यात्रेकरू पार करून थायलँडच्या माईसेत या गावापर्यंत सडकमार्गाने जाऊ शकतात. पुढे माईसेत ते कम्बोडियामध्ये प्रवेश करता येतो व यात्री अंगकोर या जागतिक कीर्तीच्या मंदिरापर्यंत पोहोचू शकतो.

कम्बोडियन जनतेचे असे मत आहे की, जे पुण्य सर्व यात्रा केल्यानंतर मिळू शकते तेवढेच पुण्य एकट्या अंगकोर या मंदिरातील देवदर्शनाने व पूजेअर्चेने मिळू

*प्रत्येक राष्ट्राला स्वत:चे असे एक व्यक्तिमत्त्व असते, प्रेरणा असते, विश्वास असतो, श्रद्धा असते. विचार पद्धती असते, योग्यायोग्यतेचे निकष असतात.*

शकते. याशिवाय पूर्वोत्तर भारतात आज जी आर्थिक दुरवस्था दिसते ती दूर होऊन तेथील जनतेचे जीवन नैसर्गिक उपजावरच फक्त अवलंबून आहे. त्याऐवजी सर्वांचेच जीवन अगदी जास्तीत जास्त नागरी सुखसंपन्न, समृद्ध अशा जीवनासारखे होऊन त्यांनाही एकंदर पूर्णपणे नागरिक व्यवस्था व आजचे जे सुखकर जीवन जगण्याच्या व्यवस्था आहेत, त्या उपलब्ध करून देण्यात येतील. म्हणजेच या वर उल्लेख केलेल्या देशांनी एखादे अर्थ व धार्मिक स्वरूप असलेली संस्था, मंडळ किंवा महामंडळ स्थापून एक प्रगतिशील पाऊल उचलण्याची आवश्यकता आहे. आजच्या मोदी सरकारचाही विचार सर्व शेजारील राष्ट्रांना मित्र म्हणून स्वरूप द्यावे, असेच आहे.

नुकतीच भारत सरकार व चीन सरकार यांच्यामध्ये कैलास मानस सरोवर यात्रा अधिक सुगम व कमी खर्चात कशी पूर्ण करता येईल याबद्दल सुरुवात करण्यात आली. सर्वच बाबी सरकार करू शकत नाही. त्यासाठी जनाधाराचीही आवश्यकता असते. माझ्या आजोबांनी किंवा अन्य तत्सम वयस्क व्यक्तींनी ७० ते ८० वर्षांपूर्वी वैष्णोदेवीची अथवा अमरनाथची यात्रा केली नाही. त्याची मुख्यत: दोन कारणे आहेत. एक म्हणजे दळणवळणाची साधने त्या काळात आजच्यासारखी नव्हती, तसेच हिंदुत्ववादी संघटनांनी एकत्रीत्या सातत्याने प्रयत्न करून या यात्रा आज नावारूपास आणल्यात. वैष्णोदेवी व अमरनाथला आताशा लाखोंच्या संख्येने लोक जातात. त्यामुळे तेथे नागरी सेवांचीही चांगली व्यवस्था आपोआपच निर्माण करावी लागली. याशिवाय अरुणाचल प्रदेशात आजही भारतीयांना सुद्धा इनर लिमिट परमिट घ्यावे लागते अन्यथा इतर प्रांतीयांना अरुणाचल प्रदेशात प्रवेश निषिद्ध आहे. या सर्व सोयी-सवलती हिंदुत्ववादी संघटनांनी प्रयत्नपूर्वक अस्तित्वात आणल्या व आज या राज्यांमध्ये भरपूर पर्यटन वाढले आहे. अनेक प्रांतांतीलच नव्हे, तर अनेक देशांतीलही लोक या धार्मिक स्थळांना पर्यटनाचे स्वरूप देऊन निसर्गसौंदर्याचा आनंद लुटत असतात. परशुराम कुंड ही यात्रा सुद्धा हिंदुत्ववादी संघटनांच्या प्रयत्नांनीच सुरू झाली असून, लद्दाख या प्रदेशातीलही भारतीय जनतेला पर्यटकांच्या माध्यमातून रोजगार तर मिळू शकलाच व त्यांना जो चिनी लोकांकडे आकर्षित करण्याचा प्रयत्न चिन्यांकडून होत होता तो संपुष्टात आला. आज लद्दाखमध्ये शाळा, दवाखाने, मार्केट यार्ड, व्यापार, लघु उद्योग अशा अर्थप्राप्ती व सोयी-सवलती उपलब्ध होऊ शकल्यात त्याचे मुख्य कारण की, या पर्यटनाला धार्मिक स्वरूप देऊन त्यातून रोजगार निर्मिती व अर्थार्जन करून जीवन अधिक सुखकर करण्याचा प्रयत्न केला जात आहे.

सध्या अमरनाथ, वैष्णोदेवी या यात्रा करणाऱ्यांची संख्या भरपूर वाढलेली आहे. अनेक ठिकाणी या यात्रेला जाण्याची योग्य व्यवस्था व्हावी म्हणून मंडळे सुद्धा निर्माण झाली आहेत. परशुराम कुंड हे सुद्धा निसर्गाची प्रचंड साधनसामुग्री असलेली, पण अतिशय मागासलेल्या अशा प्रदेशातील ठिकाणी आहे. या ठिकाणीही सध्या विविध यात्रेकरूंची संख्या अगदी हजारोंमध्ये सुरू झाली आहे. याच पद्धतीने कम्बोडियातील जगातील सर्वात जुने व त्या काळातील सर्वात मोठ्या अशा मंदिराची यात्रा सुद्धा सुरू व्हावयास पाहिजे. यासाठी वर उल्लेख केलेल्या दक्षिण पूर्व आशियातील सात-आठ देशांनी मिळून एखादी संस्था काढावयास पाहिजे व सर्व प्रकारच्या नागरी सुखसोई, दळणवळणाची माध्यमे निर्माण करून हे सर्व देश धार्मिक सूत्राशिवाय भावनिक सूत्राने बांधता येऊ शकतील असे वाटते. या भावनिकतेम ुळे अर्थात पर्यटन वाढेल व पर्यटन वाढले की पर्यायाने आर्थिक सुबत्ता यावयास वेळ लागणार नाही. आज ही जी भारतीयांची अति प्राचीन व पवित्र ठिकाणे दुर्लक्षित झाली आहेत, त्यांना पुन्हा नावरूपाला आणून त्यांची पुनर्स्थापना करण्याची वेळ आली आहे. आम्ही या बाबींना जर बढावा देणार नसू, तर आपणच आपल्या धर्माच्या ऱ्हासास कारणीभूत होऊ. म्हणून पुनर्स्थापनेचा हा प्रयत्न जनताभिमुख व्हावा, ही इच्छा.

*(साभार - दै. तरुण भारत)*

*राष्ट्राचे ध्येय ही काही एका रात्रीत निर्माण करत येण्यासारखी गोष्ट नाही. तो त्याच्या पिढ्यानुपिढ्यांचा चालत आलेला वारसा असतो.*





# भगिनी निवेदिता यांनी दिलेला मातृमंत्र

**रामकृष्ण मठ चेन्नईहून प्रकाशित होणाऱ्या वेदान्त केसरी या नियतकालिकेच्या सप्टेंबर २०११ च्या अंकात श्री प्रमथ रंजन पाल यांच्या अनुभवांवर आधारित लेख प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखाचा हा स्वैर अनुवाद.**

भगीनी निवेदिता यांच्यावर दीर्घकाळ संशोधन केलेल्या श्री शंकरी प्रसाद बसु यांनी बंगाली भाषेत २ खंडांमध्ये 'लोकमाता निवेदिता' या नावाने चरित्र लिहिले. यातील दुसऱ्या खंडात स्वामी विवेकानन्द यांची आध्यात्मिक मानसपुत्री निवेदिता यांच्या भारत प्रेमाचे मार्मिक दर्शन घडते. श्री शंकरी प्रसाद बसु यांच्याशी श्री पाल यांचा सम्पर्क १९६८ ते १९७० दरम्यान झाला. तेंव्हा ते ८४ वर्षांचे होते. १९०३ मध्ये स्थापन झालेल्या स्वामी विवेकानन्द बोर्डिंग हाउस नामक वसतिगृहात श्री प्रमथ रंजन पाल विद्यार्थी रुपात राहत होते. त्या वेळच्या एका प्रसंगाचे हे वर्णन आहे.

वसतिगृहात राहणाऱ्या ४० विद्यार्थ्यांना भगिनी निवेदिता यांच्या सत्संगाचा लाभ अनेकदा व्हायचा. हे सारे युवा भगिनी निवेदिता यांच्या व्यक्तिमत्वाने भारावलेले होते. या साऱ्यांना राष्ट्रकार्यात आणण्यासाठी भगिनी निवेदिता स्वत: प्रयत्नरत असत. हे सारे अनेकदा निवेदिता यांच्या निवास स्थानी जाऊन त्यांच्याशी अनेक विषयांवर चर्चा करीत असत.

*संतुलित सामाजिक हितसंबंध, सुखी आणि समाधानी, पिळवणुकीपासून सर्वांची मुक्तता यांची आज तीव्र निकड आहे.*

तिथे या विद्यार्थ्यांना अनेक महापुरुषांना भेटण्याची संधी मिळत असे.

प्रस्तुत प्रसंगात एके दिवशी भगिनी निवेदिता अचानक वसतिगृहाला भेट देतात आणि या विद्यार्थ्यांना अनेक दिवस घरी न येण्याचे कारण विचारतात. विद्यार्थी आपल्या व्यस्ततेविषयी सांगितल्यावर भगिनी समाधान व्यक्त करतात आणि संध्याकाळी निवासस्थानी येण्याचे आमंत्रण देतात.

संध्याकाळच्या वेळी पाल यांच्यासोबत ६-७ विद्यार्थी त्यांच्या निवास स्थानी पोहोचतात तेंव्हा अतीव आनंदाने भगिनी त्यांचे स्वागत करतात. त्यांना रसगुल्ले खाऊ घालतात. त्यांच्यासोबत बसून बोलता बोलता अभ्यास, अडचणी आणि आरोग्याची विचारपूस करतात. या आत्मीय संवादाने तरुणांची मने जिंकून घेतात. हे सारे विद्यार्थी त्यांना वीणापाणी सरस्वतीच्या रुपात पाहतात. भगिनींची शुभ्र वेशभूषा, त्यांचे जटाभारासारखे केस आणि गळ्यात मोठ्या मोठ्या रुद्राक्षांची माला, पावित्र्याची प्रतिमूर्ती.

विद्यार्थ्यांशी डॉन सोसायटीच्या संदर्भात चर्चा होते. या सोसायटीचे संस्थापक श्री सतीशचन्द्र मुखर्जी यांच्याविषयी काही आदरयुक्त गोष्टी विद्यार्थ्यांना सांगतात. बोलण्याच्या ओघात विषय धार्मिक उपदेशावर येतो तेंव्हा भगिनी विद्यार्थ्यांना विचारतात धर्म म्हणजे काय ? प्रत्येक विद्यार्थ्याला उत्तर द्यायचे आहे. प्रत्येक जण आपल्या आपल्या परीने व्याख्या करू लागतो. एक जण सांगतो, धर्म म्हणजे सर्वशक्तिमान ईश्वरावर विश्वास, एक म्हणतो मोठ्यांचे आज्ञापालन म्हणजे धर्म, तिसरा उपासना, कर्मकांडाचे पूर्ण कठोर पालन म्हणजे धर्म असल्याचे सांगतो; चौथा विद्यार्थी सांगतो - प्रामाणिक व्यवहार म्हणजे धर्म तर पाचवा सांगतो दुसऱ्यासोबत न्यायपूर्ण व्यवहार म्हणजे धर्म. एक विद्यार्थी जो संस्कृतचा विद्यार्थी आहे तो मनुस्मृतीतील श्लोकाचा दाखला देत सांगतो की जो धारण करतो तो धर्म.

मोठ्या स्नेहाने सर्वांचे ऐकून घेतल्यानंतर भगिनी निवेदिता त्यांना म्हणतात, ''तुम्ही केलेल्या धर्माच्या व्याख्या ऐकून मला आनंद वाटला. सनातन धर्मातून या साऱ्या गोष्टी आपल्याकडे झिरपत येतात. परंतु, तुमच्या धर्माच्या या सर्व धरणांहून अधिक महान, अधिक उन्नत आणि आपल्या साऱ्यांच्या जीवनासाठी अत्यंत पवित्र अशी गोष्ट आता मी तुम्हास सांगत आहे. माझा तुम्हा लोकांना आग्रह आहे की या गोष्टी तुम्ही आपल्या जीवनात उतरवाव्यात. आपले सर्वात उदात्त आणि महान दायित्व समजून सर्वोच्च प्राधान्याने आचरणात आणावे.

आपली सर्वात पहिली आवश्यकता आहे की आपल्या महान मातृभूमीला जाणा ! आपली महान माता! भारतमाता! आपली माता व मातृभूमीत कधीही भेद करू नका. मी आपल्याला सल्ला देईन की जा हिला पहा. हिची प्रदक्षिणा करा, लोकांना जाणून घ्या. त्यांची उपासना, संस्कृती, साहित्य, भाषा, रूढी आणि परंपरा; एका शब्दात सांगायचे तर त्यांचा समग्र इतिहास जाणून घ्या. पुन्हा पुन्हा, जेंव्हा कधी संधी मिळेल त्यांना आत्मीयतेने भेटा आणि प्रेम करा.

जसे मूल आपल्या आईशी निःसंकोच आत्मीयतेने भेटते, कुशीत शिरते, अगदी तसेच आपणही मातृभूमीवर प्रेम करा, आदर करा, सेवा करा, सर्वोच सम्मानजनक अभिवादनाने तिची पूजा करा! वन्दे मातरम् ''

त्यांनी वन्दे मातरम् चे उच्चारण शुद्ध संस्कृतमध्ये केले आणि शांत बसून राहिल्या. सर्व विद्यार्थी अभिभूत होऊन पाहत राहिले.

सर्व जण त्यांच्या मुखमंडलाकडे पाहत होते. जेंव्हा त्या भारतमातेप्रती श्रद्धेने बोलत होत्या तेंव्हा त्यांच्या चेहऱ्यावर एक अलौकिक प्रभा पसरली होती. थोड्या वेळाने त्यांनी सर्व विध्यार्थ्यांना निरोप दिला. यावेळी त्या म्हणाल्या की, '' आपल्या स्थानी जाऊन या गोष्टीवर ध्यान करा. गांभीर्याने विचार करा आणि या सर्वाधिक उदात्त मंत्रावर विचार करा... वन्दे मातरम् !''

सर्व विद्यार्थी एका उच्च भावावस्थेत वसतिगृहात परतले. भगिनी निवेदिता यांचे भारतप्रेम अगाध

होते. इंग्रजीतून बोलतानाही त्यांनी कधी मातृभूमीसाठी 'इट' सर्वनामाचा प्रयोग केला नाही, त्या सदैव 'हर' सर्वनामाचा प्रयोग करीत. अर्थात भारतमाता त्यांच्यासाठी निष्प्राण भूखण्ड नव्हे साक्षात जागृत देवता होती.

त्या दिवशी संध्याकाळी सर्वजण याच विषयावर चर्चा करीत होते. जे विद्यार्थी उपस्थित नव्हते त्यांना सर्वजण निवेदिता यांच्या निवास स्थानी झालेल्या चर्चेचे वर्णन पुन्हा पुन्हा सांगत होते. सर्वांना वाटत होते की त्यांच्या गुरूदेवांचा आत्माच त्यांच्याकडून काम करवून घेत आहे. आनन्दमठ काव्याला भगिनी निवेदिता यांनी जिवंत केले होते. मुळापेक्षाही अधिक प्रभावी केले होते.

दुसऱ्या दिवशी दुपारी अचानक एका विद्यार्थ्याने माहिती दिली की भगिनी निवेदिता यांची घोड़ागाड़ी आली आहे. सर्व विद्यार्थी सभागृहात एकत्रित झाले. निवेदिता यांनी गार्डला सांगून गाडीतून एक मोठी भेंडोळी मागविली. व्यवस्थापकही लगबगीने आले. भगिनीने संचालक स्वामीजींना बोलावणे पाठविले. ते आल्यानंतर भगिनीने पूर्ण गुडघे टेकवून स्वामी सच्चिदानन्दजी यांना प्रणाम केले.

मोठा खिळा आणि होतोडा मागविला गेला आणि स्वामीजींच्या अनुमतीने भिंतीच्या मध्यभागी खिळा ठोकण्यात आला. भेंडोळी उघडण्यात आली तेंव्हा त्यातून भारताचे विशाल मानचित्र समोर आले ५ फुट रुंद आणि ६ फुट लांब. खरेदीची पावतीही भेंडोळीतून खाली पडली. २५ रुपयांचे ते मानचित्र होते. त्या काळातील २५ रुपये. मानचित्र भिंतीवर टांगण्यात आले. ***

# यांनी चोखाळली वेगळी वाट

नुकताच दापोलीस गेलो होतो. तेथे दापोली - दाभोळ रस्त्यावर बस स्थानकापासून १० मिनिटांच्या अंतरावर 'उपहार' नावाचे हॉटेल आहे. हॉटेलचालक श्री. तन्मय ताडफळे या तरुणाची ओळख झाली. तन्मय हा २३ वर्षांचा युवक. पुण्यात इंग्रजी विषयात बीएची पदवी घेतल्यानंतर त्याने यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापिठातून मराठीतून एमएची पदवी संपादन केली. नोकरी करण्यापेक्षा व्यवसाय करण्याकडे हल्ली तरुणांचा कल असतो. त्यातला हा तन्मय.

नोकरी कधीच करायची नाही, असे त्याने खूप आधीच ठरवल्याचे सांगितले. तन्मयचे आजोबा श्री. केशव बाळकृष्ण ताडफळे (वय ८३) यांची बँक ऑफ महाराष्ट्रमधील अधिकारीपदाच्या नोकरीनंतर त्यांनी महाबळेश्वर येथे एक रिसॉर्ट सुरू केले होते. त्यांचा या व्यावसायातील दांडगा अनुभव आणि मार्गदर्शन तन्मयला मिळाले. १० नोव्हेंबर २०१४ रोजी त्यांनी या व्यावसायाला सुरुवात केली. त्यास बँक ऑफ महाराष्ट्राचे अर्थसहाय्यही मिळाले आहे.



स्वच्छता, टापटीप आणि येणाऱ्या अतिथींची आपुलकीने विचारपूस व तत्परसेवा या चतु:सूत्रीवर तन्मयचा विश्वास अन् त्याप्रमाणे कृती. यामुळे अल्पावधीतच दापोलीतील नाष्ट्याचे सर्व पदार्थ व जेवण मिळणारे 'उपहारगृह' नावारूपास येत आहे. वेगळी वाट चोखाळणाऱ्या तन्मयला शुभेच्छा देऊया. दापोलीला गेलात तर 'उपहार' गृहास अवश्य भेट द्या. तन्मयचा भ्रमणध्वनी ९८८१०७२५७६.

ई मेल ttadphale@yahoo.in

*जयवंत फडके, पुणे*

*संघर्षविरहित समाजव्यवस्था हे भारताने जगाला द्यायचे सर्वात अप्रतिम आणि अमूल्य असे देणे असेल.*

# केंद्रवृत्त

## पुण्यात व्यक्तिमत्त्व विकास शिबिर

'सफल युवा, युवा भारत' या प्रकल्पांतर्गत 'एक दिवसीय व्यक्तिमत्व विकास शिबीर' घेण्यात आले. यात ८ महाविद्यालयातून १८५ विद्यार्थी सहभागी होते. अखिल भारतीय प्रशिक्षण प्रमुख बसवराज देशमुख, विभाग संघटक संध्या पाटील, युवा प्रमुख सागर लाड यांची प्रमुख उपस्थिती होती. परीक्षेच्या माध्यमातून जोडलेल्या २० युवकांनी हे शिबिर घेतले. सागर लाड यांनी 'विवेकानंद आणि व्यक्तिमत्त्व विकास' यावर मार्गदर्शन केले. लव इंडिया, अर्थ नियोजन, समाजकार्य का करावे, स्मार्ट सिटीत माझे योगदान आणि उत्सवाचे



विधायक स्वरूप या विषयावर गटचर्चा झाली. समारोपात बसवराज देशमुख यांचे मार्गदर्शन झाले.

## नागपुरात संदेश पठण स्पर्धा



चार ऑगस्ट ते १९ ऑगस्ट या कालावधीत तिसरी ते नववीच्या विद्यार्थ्यांसाठी 'मैं विवेकानंद बोल रहा हूँ' संदेश पठण स्पर्धा घेण्यात आली. तीन गटांत मराठी, हिंदी व इंग्रजी भाषेतील या स्पर्धेत २२ शाळांमधील ३८६ विद्यार्थ्यांनी सहभाग नोंदवला. अंतिम फेरीतील १६० विद्यार्थ्यांचे एकदिवसीय शिबिर २३ ऑगस्टला अहिल्या मंदिरात झाले. पत्रकार सई देशपांडे यांनी बालपणातील स्वामी विवेकानंद यावर मार्गदर्शन केले. स्पर्धेच्या बक्षिस वितरणास राष्ट्र सेविका समितीच्या नागपूर विभाग बौद्धिक प्रमुख मेधा नांदेडकर उपस्थित होत्या.

## वर्धा येथे गुरूपौर्णिमा उत्सव

३१ जुलै रोजी वर्धा येथे गुरुपौर्णिमा उत्सव साजरा करण्यात आला. अशोक सावरकर, विजय कालबांडे यांच्या हस्ते दीप्रज्ज्वल झाले. प्रास्तावकि अमोल गाढवकर यांनी केले. विशाल दादुरवाडे यांनी भजन गायिले. अनंत बोबडे यांनी गुरुपौर्णिमेविषयी मार्गदर्शन केले. सूत्रसंचालन गोपाल खंडागळे यांनी केले.

## अमरावती येथे विश्वबंधुत्व दिन साजरा

११ सप्टेंबर रोजी नगर वाचनालयात विश्वबंधुत्व दिन कार्यक्रम झाला. प्रमुख पाहुणे म्हणून नरेंद्र झाडे हे उपस्थित होते. अभाविपच्या विदर्भ प्रांत मंत्री शुभांगी नक्षिने हिने मार्गदर्शन केले. यावेळी अरुणा देशपांडे, नगर संयोजक संजय पाचखेडे उपस्थित होते. १९ नोव्हेंबर रोजी मराठी प्रकाशन विभागाच्या दर्शन ध्येयासक्तीचे या पुस्तकाचे प्रकाशन करण्यात आले. यावेळी श्री. मांडवेकर उपस्थित होते.

*नशीब नावाची काही गोष्टच या जगात अस्तित्वात नाही. आपले जीवन हे आपल्या कर्मांचा परिणाम असते.*

# नागपुरात विश्वबंधुत्व दिन, बक्षीस वितरण



विश्वबंधुत्व दिनानिमित्त ११ सप्टेंबर रोजी आंतर महाविद्यालयीन युवा महोत्सवांतर्गत घेतलेल्या वक्तृत्व, क्लिप्टिविटी, पीपीटी, पथनाट्य स्पर्धेचे बक्षीस वितरण झाले. एनएडीटीचे उपसंचालक संदीपकुमार साळुंखे यांच्या हस्ते बक्षिसे देण्यात आली. यावेळी अरुण करमरकर लिखित दर्शन ध्येयासक्तीचे या पुस्तकाचे प्रकाशन झाले. यावेळी नगर संचालक डॉ. जगदीश हेडाऊ, नगरप्रमुख गौरी खेर आदि उपस्थित होते. दरम्यान, या स्पर्धांत २२ महाविद्यालयातील १२७ विद्यार्थी सहभागी झाले. वक्तृत्व स्पर्धेत नेहा लाभे (धरमपेठ विज्ञान महाविद्यालय) हिने प्रथम, रविरंजन दत्ता (मोखरे महाविद्यालय)द्वितीय, आयुषी सावरकर (केडीके अभियांत्रिकी महाविद्यालय) तृतीय, प्राची अग्रवाल (डॉ. आंबेडकर विधी महाविद्यालय) व रेणुका देशपांडे (कमिन्स अभियांत्रिकी) उत्तेजनार्थ.

क्लिप्टिविटी व पीपीटमध्ये शिवानी सिंह व ऐश्वर्या पाटील (शासकीय दंत महाविद्यालय) प्रथम, स्नेहा नगराले व खान अफरीन (शासकीय दंत महाविद्यालय) द्वितीय, कोमल तरमले (कमिन्स अभियांत्रिकी) तृतीय. पथनाट्य स्पर्धेत सात संघ सहभागी झाले. शासकीय दंत महाविद्यालय प्रथम, आर्टस प्लानेट इन्स्टिट्यूट द्वितीय, धरमपेठ विज्ञान महाविद्यालय तृतीय. अधिक विद्यार्थ्यांच्या सहभागासाठीचे बक्षीस राजकुमार केवलरमानी कन्या महाविद्यालयात देण्यात आले.

# नाशिकमध्ये 'दर्शन ध्येयसक्तीचे' प्रकाशन

स्वामी विवेकानंद यांची विश्वबंधुत्वाची संकल्पना अत्यंत व्यापक होती. प्रेम, सत्य, श्रद्धा, सामर्थ्य व राष्ट्रभक्ती या पाच गोष्टींद्वारेच ती प्रत्यक्षात साकारली जाऊ शकते, असे प्रतिपादन पुण्याच्या गरवारे महाविद्यालयाच्या प्रा. सुरुची पांडे यांनी केले. विवेकानंद केंद्राच्या नाशिक शाखेच्या वतीने ११ सप्टेंबर रोजीच्या विश्वबंधुत्व दिनाच्या पार्श्वभूमीवर शंकराचार्य संकुल येथे पांडे यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. त्यांनी 'स्वामीजींना अभिप्रेत असलेली विश्वबंधुत्वाची कल्पना आणि उद्याचा भारत' या विषयावर मार्गदर्शन केले. प्रारंभी केंद्राच्या वतीने 'दर्शन ध्येयासक्तीचे', 'सामान्य माणसाची असामान्य संघटना' या दोन पुस्तकांचे प्रकाशन करण्यात आले. केंद्र कार्यकर्त्या विद्या सालेमठ यांनी प्रास्ताविक केले. अभिषेक मुळे यांनी परिचय करून दिला. केंद्रप्रमुख जयंत दीक्षित यांनी स्वागत केले. निशिगंधा मुळे यांनी सूत्रसंचालन केले.





*आपण आपल्या स्वधर्मानुसार प्रगती केली पाहिजे. विदेशी समाजांनी आपल्यावर जे कलम केले आहे त्यानुसार वाढण्यासाठी प्रयत्न करणे हे निष्फळ होय. हिंदुस्थानला मोडून, मुरगळून इतर राष्ट्रांच्या साच्यात घालणेच अशक्य आहे. परमेश्वराची ही केवढी कृपा !*

*– स्वामी विवेकानंद*

*'पेरावे तसे उगवते' हा नियम कर्माला तंतोतंत लागू आहे.*



## • माते ! तुझा पुत्रच तुइयासमोर ! •

अमेरिकेतील स्त्रिया खूप मुक्त, प्रगतशील विचारांच्या होत्या. त्या स्वामीजींच्या आकर्षक सुदर्शन व्यक्तिमत्वावर अनुरक्त व्हायच्या. स्वामीजींच्या अमेरिकेतील शिष्य, भक्त, हितचिंतक व चाहत्यांमध्ये पंचाहत्तर टक्के स्त्रिया होत्या. स्वामीजीं हिंदू नैष्टिक ब्रम्हचारी होते व गुरु रामकृष्णांचे तपःपूत जीवन त्यांनी नसानसात भिनविले होते. एकदा एक सौंदर्यवती ललना स्वामीजींना म्हणाली 'मला ,तुमच्यासारखा पुत्र हवाय', क्षणाचाही विलंब न लावता स्वामीजी म्हणाले 'माते! तुझ्या समोर तुझा पुत्रच उभा आहे'. असे वासनामुक्त , निर्मळ, निष्कलंक होते स्वामीजी.

२७

## ... यांची वर्गणी संपत आहे

आपल्याला येणाऱ्या 'विवेक विचार'च्या पाकिटावरील पत्त्याच्या पहिल्या ओळीचा शेवट **'201512'** असा असेल तर तुमची वर्गणी **डिसेंबर २०१५** मध्ये संपत आहे. कृपया पुढील वर्षाची वर्गणी भरा. यावेळी आपला वर्गणीदार क्रमांक (पाकिटावरील पत्त्याची पहिली ओळ) अवश्य कळवा.



## विवेकानंद केंद्र, कन्याकुमारी येथे निवासी शिबिर

विवेकानंद केंद्र कन्याकुमारी येथे नियमितपणे योग शिबिर व आध्यात्मिक शिबिरांचे आयोजन करण्यात येत असते. महिला व पुरुष कुणीही या शिबिरात सहभागी होऊ शकतात. शिबिरांमधील व्याख्याने, सूचना इत्यादी इंग्रजी अथवा हिंदीतून दिल्या जातात. पुढील काळातील शिबिराची माहिती...

**योगशिक्षा शिबिर (हिंदी/इंग्लिश)**
**१ ते १५ डिसेंबर २०१५ :**
**वयोगट १८ ते ५०**
**देणगी शुल्क रु. २०००/- फक्त.**
**अधिक माहितीसाठी :**camps@vkendra.org /
Fax : 04652-247177
Visit us @ : www.vkendra.org

*वर्तमानकाळ हा भूतकाळाचा परिणाम असतो. तो बदलणे आपल्या हातात नसते.*

# 'विवेक विचार'चे सदस्य व्हा

NEFT/चेक/डीडी/नेट बँकिंग याद्वारे / विवेकानंद केंद्राच्या कोणत्याही शाखेत प्रत्यक्ष जाऊन वर्गणी भरू शकता/ ई-मनीऑर्डरने : मनिऑर्डरच्या 'मेसेज बॉक्स'मध्ये नाव, पूर्ण पत्ता, पिनकोड व मोबाईल नंबर आवश्यक/ खात्यामध्ये रोखीने : वर्गणी + ३० रुपये (बँक चार्जेस)

खात्याचे नाव - **विवेक विचार** / खाते क्रमांक - **30127267764**
बँकेचे नाव - **भारतीय स्टेट बँक** /शाखा - **स्टेशन रोड, रेल्वे लाईन्स, सोलापूर**
शाखा कोड -**1656**/**IFSC कोड - SBIN0001656**

**महत्त्वाचे** : वर्गणी भरल्यानंतर त्वरीत **vivekvichar@vkendra.org** वर ई-मेलने किंवा **8855872228** वर **SMS** ने पूर्ण पत्ता, पिनकोड, मोबाईल नंबर, भरलेली रक्कम कळवायला विसरू नका.

## सदस्यता फॉर्म




मासिक मागविण्याचा पत्ता (पिनकोडसह)

.................................................
.................................................
.................................................
.................................................
.................................................
.................................................
.................................................

दूरध्वनी : ....................................

ई-मेल
(कृपया इंग्रजी कॅपिटल लेटरमध्ये लिहा.)

.................................................

- मी पुढील प्रकारचा सदस्य होऊ इच्छितो/इच्छिते.

| | |
|---|---|
| ☐ वार्षिक | ₹ १५०/- |
| ☐ त्रैवार्षिक | ₹ ४००/- |
| ☐ पंचवार्षिक | ₹ ६००/- |
| ☐ आजीव (२० वर्ष) | ₹ २५००/- |
| ☐ संवर्धक | ₹ ३०००/- |

**आपल्या प्रियजनांच्या वाढदिवसानिमित्त त्यांना विवेक विचार चे अंक पाठवू शकता.**

**आधी विचार जन्म घेतात, मग कृती! - स्वामी विवेकानंद**

आपले भविष्य हे आपल्या आजच्या कर्मांचा परिणाम असणार आहे. म्हणून आपण आजच्या कर्मांनी आपल्या भविष्याला आकार देऊ शकतो.

केव्हा बोलायचे व केव्हा मौन पाळायचे हे समजणे ही क्वचित मिळणारी देणगी आहे.

